येईल असें माझ्या स्वप्नींही आलें नाही. माझ्या आटोक्याबाहेरचें हें काम आहे, हें जाणून मीं तें टाळण्याचा प्रयत्न केला पण अखेर मित्रांच्या आग्रहामुळे मला तें स्वीकारावें लागलें. ह्यानंतर अध्यक्षाच्या भाषणांत आपण काय बोलावें हा विचार मनांत घोळूं लागला. ह्यावेळीं जपानां-तील स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीची हकीकत देणाऱ्या पुस्तकाची आठवण झाली व तें मीं अथपापासून इतिपर्यंत वाचलें आणि कांही एक अवर्ण-नीय वारें माझ्या शरिरांत व मनांत खेळूं लागलें. जपानी बांधवांनी ज्या मार्गाचा स्वीकार केला त्या मार्गाचा स्वीकार केला तरच आपल्या स्त्रियांमध्ये माध्यमिक व उच्च शिक्षणाचा प्रसार बऱ्याच वेगाने करतां येईल, असे विचार मनांत घोळूं लागले.

जपानी लोकांच्या स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीच्या प्रयत्नांत जो भाग मला विशेष आवडला त्यासंबंधाचे उतारे माझ्या सामाजिक परिषदेच्या भाषणांत मीं घेतले होते. ह्या उताऱ्यांतील विचार मला सर्वस्वी मान्य झाले. हे व अशा रीतीचे दुसरे विचार वाचून उद्योगाला प्रवृत्त करणारीं व तो पुढे नेटाने चालविण्याचा उत्साह कायम ठेवण्यास कारण होणारीं-जीं माझीं मतें बनलीं, तीं अशीं:—

( १ ) आपण जबाबदार मानवी व्यक्ति आहों ही भावना व आपल्या सामर्थ्याविषयी आत्मविश्वास ज्याच्या योगाने उत्पन्न होईल असें पुरुष-सामान्य शिक्षण स्त्रियांना देणें.

( २ ) आपल्या देहाचे घटक ज्याप्रमाणे भिन्न भिन्न पेशी, त्या-प्रमाणे समाज किंवा राष्ट्ररूप देहाचे घटक जीं कुटुंबें तीं जोमदार व मनो-हर बनविणें मुख्यतः कुटुंबांच्या सूत्रधार ज्या स्त्रिया त्यांजवर अवलंबून आहे. कुटुंब ही संस्था डळमळीत होईल अशी प्रवृत्ति स्त्रीवर्गांत उत्पन्न होऊं देणें राष्ट्राला विघातक आहे, तेव्हा कुटुंबें, इंग्रजींत Home ह्या शब्दांत किंवा 'गृहिणी गृहमुच्यते' या वाक्यांत जो गर्भित अर्थ साठ-

विला आहे, तशीं बनविण्याचें सामर्थ्य ज्या शिक्षणाच्या योगाने स्त्रियांमध्ये उत्पन्न होईल, असें शिक्षण त्यांना देणें.

( ३ ) आपण राष्ट्राच्या घटक आहों, ही भावना ज्या शिक्षणाने उत्पन्न होईल असें शिक्षण स्त्रियांना दिलें पाहिजे. त्याचप्रमाणे मुलांमुलींच्या कोवळया अन्तःकरणांत राष्ट्रीय भावनांचें बीज पेरणें, राष्ट्रांतील साधुसंतांविषयी पूज्यबुद्धि व पराक्रमी पुरुष ( युद्धांत पराक्रम दाखविणारेच केवळ नव्हत ) आणि तेजस्विनी स्त्रिया यांच्याबद्दल आदर उत्पन्न करणें, हें अत्यंत नाजूक व पवित्र कर्तव्य राष्ट्रांतील आयांचें आहे. हें कर्तव्य उत्कृष्ट रीतीने बजावण्याचें सामर्थ्य ज्या शिक्षणाने अंगीं येईल असें शिक्षण त्यांना देणें.

( ४ ) कांही कारणांनी आपण संसारांत पडूं नये असें ज्या स्त्रियांना वाटत असेल त्यांनी आपापलीं ध्येयें ठरवून तीं ध्येयें साध्य होण्याला ज्या शिक्षणाची जरूर असेल तें शिक्षण त्यांनी अवश्य घ्यावें व आपली कर्तव्याची दिशा ठरवावी. अशा स्त्रियांचा लहानसा वर्गहि राष्ट्राच्या स्थैर्याला व प्रगतीला आवश्यक आहे. स्त्रियांनी अमुक करावें किंवा तमुक करूं नये अशा रीतीचे कायद्याने किंवा समाजाने घातलेले निर्बंध साफ काढून टाकले पाहिजेत. ह्या संबंधांत पुरुषांचे व स्त्रियांचे हक्क समान असावेत. कोणत्याही स्त्रीला अमुक विद्या आपण शिकावी किंवा अमुक उद्योग आपण करावा, असें वाटेल तर कायद्याचीं अगर समाजाचीं बंधनें तिच्या मार्गांत आडवीं येऊं नयेत. तथापि समाजस्थैर्यासाठी किंवा त्यांच्या शारीरिक व मानसिक घटनेचा विचार करतां सामान्यतः स्त्रियांनी कोणतें शिक्षण घ्यावें व कोणते उद्योग करावे ह्याविषयीचा विचार होणें अत्यंत जरुरीचे आहे. सर्व प्रकारच्या विचारांना वाव मिळाला पाहिजे व त्या विचारांचें कृतींत प्रतिबिंब उठविणारीं, त्या विचारांना वाहिलेलीं माणसें पाहिजेत. अशा विचारांच्या व कृतींच्या झगड्यांतूनच उत्क्रान्तीची वाट गेलेली आहे.

वरील धोरणाने नरुसे यांनी १९०० सालीं काम सुरू केलें व त्यांत त्यांना यशही फार चांगलें आलें. बारा वर्षांत त्या युनिव्हर्सिटींतून १२४३ स्त्रिया पदवीधर होऊन बाहेर पडल्या. १९०० सालाच्या पूर्वी सगळ्या जपान देशांत स्त्रियांचीं हायस्कुलें १२ होतीं तीं १९१२ त १८२ झालीं. इतकी विलक्षण प्रगति थोड्या काळांत झालेली पाहून आपणही त्यांनी घालून दिलेल्या मार्गाने जावें असें मला वाटूं लागलें. कोणतीही योजना तात्त्विक दृष्टीने विचार केला असतां कितीही इष्ट दिसली तरी तिजबद्दल सुशिक्षित लोकांतही सहानुभूति उत्पन्न होणें कठिण असतें. ती योजना प्रत्यक्ष कृतींत उतरली व तिला थोडें थोडें यश येऊं लागलें तरच हळू हळू तिजबद्दल लोकमत अनुकूल होऊं लागतें व बऱ्याच काळानंतर तिजविषयी लोकांमध्ये विश्वास उत्पन्न होऊं लागतो. ह्यासाठी लोकमताच्या फारशा अनुकूलतेची किंवा द्रव्य-बळाची वाट न पाहतां अल्पप्रमाणावर सुरुवात करावी असे विचार माझ्या मनांत येऊं लागले. कोणतेही नवीन विचार समाजाच्या हिताचे आहेत की अहिताचे आहेत हें पुष्कळ वर्षांच्या अनुभवाने ठरावयाचें असतें. तेव्हा प्रत्येकाने आपल्या समजुतीप्रमाणे राष्ट्रकार्य करीत राहावें, हाच उत्तम मार्ग. ह्या त्यांच्या युनिव्हर्सिटीला सरकारची मदत अगर सरकारचें नियंत्रण नाही. राजकुलांतील अगर सरकारी अधिकाऱ्यांची मदत आहे पण संघटित सरकारचा संबंध नाही.

आपल्या देशांत असलीं कामें करणाऱ्यांच्या मार्गांत अनेक अडचणी आहेत याची जाणीव मला होती. अगोदर उच्च शिक्षण घेणाऱ्या स्त्रियाच फार थोड्या. त्यांत ज्या पदवीला अगर सर्टिफिकेटाला सरकारी मान्यता नसेल अशा मार्गाकडे वळणाऱ्या स्त्रिया कितीतरी थोड्या सापडणार. आपली सामुग्री काय ती एक लहानसें हायस्कूल व स्वार्थत्यागाने काम करणारीं थोडींशीं योग्य माणसें. अशा कामाला हीं खात्रीने पुढे सर-सावतील असा मला विश्वास होता. आपलीं वीस वर्षें स्त्रियांच्या ज्या संस्थांसाठी खटपट करण्यांत गेलीं आहेत त्याच संस्थांना निराळें वळण

देण्याचा प्रयत्न करावा असें माझ्या मनाने घेतलें व जेव्हा ही इच्छा प्रबळ होऊं लागली तेव्हा आश्रमांतील आजन्मसेवकांजवळ ह्यासंबंधाने चर्चा करूं लागलों. त्यांची सहानुभूति मिळते आहे तोंच महादेव केशव गाडगीळ ह्यांनी दरसाल एक हजारप्रमाणे दहा वर्षे मदत करण्याचें आश्वासन दिलें.

तेव्हा थोडीशी अधिक उमेद येऊन ह्यासंबंधाचे माझे विचार आश्रमाच्या व्यवस्थापक मंडळीपुढे मांडले. ह्या मंडळीच्या सभेंत "महाराष्ट्रासाठी मराठी भाषेंतून शिक्षण देणारी व इंग्रजी भाषा जींत आवश्यक विषय म्हणून शिकविली जाईल अशी स्त्रियांची युनिव्हर्सिटी स्थापन करण्याचा प्रयत्न अनाथबालिकाश्रमाच्या मंडळीने करावा व त्या युनिव्हर्सिटीचें पहिलें कॉलेज महिलाश्रमाला जोडून जितकें लवकर काढतां येईल तितकें काढावें." असा ठराव मंजूर झाला.

ही परवानगी मिळाल्यामुळे मला अतिशय आनंद झाला. सामाजिक परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांत अशा युनिव्हर्सिटीची रूपरेखा देऊनच मी थांबलों नाही तर लवकरच अशी युनिव्हर्सिटी स्थापन करण्याचा प्रयत्न केला जाईल असेंही मीं सांगून टाकलें होतें. हें करणें धाष्टर्याचें होतें, असें आता मला वाटतें. परंतु त्यावेळच्या उत्साहाच्या भरांत तें मी करून गेलों.

आश्रमाच्या मंडळीची असाधारण सभा १३ फेब्रुवारी १९१६ रोजीं झाली व त्या सभेंत "भारतवर्षीय महिलाविद्यापीठ" अथवा "इंडियन् विमेन्स युनिव्हर्सिटी" हें नांव सुचविण्यांत आलें व व्यवस्थापक मंडळीच्या शिफारसीप्रमाणे प्रोव्हिजनल कमिटी (तात्पुरतें मंडळ) कायम करण्यांत आली. सेनेट व सिंडिकेट नेमली जाऊन त्यांच्या स्वाधीन सर्व व्यवस्था होईपर्यंत प्रोव्हिजनल कमिटीने काम करावें असें ठरलें.

तेव्हा नेटाने काम करण्याची वेळ आली. मी प्रथम पुण्यांत आणि मुंबईत पुष्कळ लोकांना भेटून त्यांजकडून मदत मिळविली व नंतर गुजराथ, मद्रास इलाखा, बंगाल, संयुक्त प्रांत, व पंजाब या प्रांतांत फिरून प्रचा-

ां व वर्गणी मिळवण्याचें काम केलें. इतर प्रांतांत मतदार मिळविण्या- ा कामीं कृष्णाबाई ठाकूर (आतां सरलाबाई नाईक), वेणूबाई ाजोशी (आतां जानकीबाई साठे) व पार्वतीबाई आठवले यांनी : चांगली मदत केली.

ठराविक वार्षिक वर्गणी किंवा देणगी देणाऱ्या स्त्रीपुरुषांना वेगवेगळ्या दारसंघांत दाखल केलें. ह्या मतदारांनी व आश्रमाच्या सभासदांनी डलेल्या मिळून ६० सभासदांची सेनेट बनली व तिची पहिली सभा भांडारकरांच्या अध्यक्षतेखाली ता. ३ व ४ जून १९१६ ह्या दिवशीं र्गुसन कॉलेजांत भरली. सेनेटने निवडलेल्या अकरा सभासदांची डेकेट (कार्यकारी कमेटी) कायम करण्यांत आली व रजिस्ट्रारचें ा मजवर सोपविण्यांत आलें. अशा रीतीने ता. ३ जून १९१६ ीं भारतवर्षीय महिलाविद्यापीठाला वेगळें अस्तित्व प्राप्त झालें व ाव्हर्सिटी ही स्वतंत्र संस्था होऊन ती आश्रमापासून वेगळी झाली.

महिलाविद्यापीठाची कल्पना मनांत आल्यापासून तीन चार महिन्यां- ती सामाजिक परिषदेंतून ता. ३० डिसेंबर १९१५ रोजीं लोकांपुढे ्यांत आली व नंतर पांच महिने व चार दिवस एवढ्या अल्पावधींत- ्या कल्पनेला मूर्त स्वरूप देतां आलें. स्वावलंबन व स्वाभिमान ी कास धरल्यामुळेच इतक्या जलदीने काम पार पडलें. सरकारची यता मिळविण्याच्या नादाला जर आम्ही लागलों असतों तर ह्या ाला आरंभच कधी झाला नसता. पुण्याच्या युनिव्हर्सिटीचा प्रश्न त कसा भिजत पडला आहे तो पहा! दहा लाख प्राथमिक खर्च ीन लाख वार्षिक खर्च एवढ्याची तजवीज करा व पुढे कामाला हात ा असा सल्ला ह्या कामीं पूर्वी उचल झाली तेव्हा पुढाऱ्यांना मिळाला ा. त्यानंतर बरींच वर्षे ह्या युनिव्हर्सिटीसंबंधाने संभाषणांत अगर ंत एक अक्षरही आढळून आलें नाही. अलिकडे पुन्हा ह्या प्रश्नाने डोकें काढलें आहे पण मतामतांच्या गलबल्यांत त्याचा कसा बोजवारा

उडत आहे, हें दिसतच आहे. तथापि ह्या कामांत कांहीं उत्साही मंडळी आता मन घालीत आहेत, तेव्हा थोडासा आशेचा किरण दिसूं लागला आहे. आरंभीं लुटुपुटीची वाटणारी आमची युनिव्हर्सिटी अस्तित्वांत येऊन ती सतरा वर्षें चालली आहे व स्त्रियांच्या शिक्षणाचें केवढें तरी कार्य करीत आहे. जेवीन तर तुपाशीं नाही तर उपाशी असा सरकारी व सरकारी मान्यतेच्या कामांचा प्रकार आहे !

तारीख ३ जून १९१६ रोजीं महिला–विद्यापीठाचा जन्म होऊन त्याच दिवशीं त्याचें यथाविधि नामकरणही झालें. स्वतंत्रपणें हायस्कूल व कॉलेज चालविण्याचें सामर्थ्य विद्यापीठाच्या अंगीं नसल्यामुळे आश्रमाच्या आश्रयाने चाललेला महिलाश्रम व त्याच्याच आश्रयाखाली निघणारें कॉलेज ह्या संस्था युनिव्हर्सिटीला जोडून घेण्याचा ठरावहि त्याच वेळीं झाला. त्याच सभेंत चालचलाऊ नियम व अभ्यासक्रम वगैरे ठरून पहिली प्रवेश परीक्षा ताबडतोब घेण्याचें ठरलें होतें. त्याप्रमाणे प्रवेश-परीक्षा ता. २६ जून १९१६ रोजीं महिलाश्रमांत घेण्यांत आली. ह्या परीक्षेंत पास झालेल्या विद्यार्थिनींचा पहिल्या वर्षाचा वर्ग ता. ५ जुलई १९१६ रोजीं सुरू करण्यांत आला. अशा रीतीने विद्यापीठाच्या खऱ्या कामाला आरंभ झाला.

“ सर्वारंभास्तंडुलप्रस्थमूलाः ”. द्रव्य मिळविल्यावाचून विद्यापीठाची प्रगति होणें अशक्य, हें स्पष्ट दिसत होतें. हें काम मुख्यत्वेंकरून माझ्यावरच पडलें. तेव्हा प्रिन्सिपॉलचें काम पार्वतीबाई आठवले यांचे चिरंजीव नारायण महादेव आठवले यांजवर व रजिस्ट्रारचें काम हरि रामचंद्र दिवेकर यांजवर सोपवून मी लोकमत तयार करणें व द्रव्यार्जन करणें या कार्यासाठी मोकळा झालों. मला विद्यापीठाचा ऑर्गनायझर नेमलें. तेव्हापासून आजपर्यंत मी हेंच काम करीत आहें.

पहिल्या चार वर्षांत विद्यापीठाचें म्हणण्यासारखें पुढे पाऊल पडलें नाही. प्राथमिक शाळांतील शिक्षकिणी तयार करण्यासाठी १९१७

च्या जूनमध्ये आश्रमाच्या मंडळीच्या आश्रयाखाली अध्यापिका-शाळा उघडण्यांत आली व ती विद्यापीठाला जोडण्यांत आली. अशा रीतीने महिलाश्रम, अध्यापिकाशाळा व महिलापाठशाळा या हिंगण्याच्या तीन संस्था म्हणजेच विद्यापीठ अशी स्थिति होती. तथापि या चार वर्षांत विद्यापीठाच्या चार पदवीधर स्त्रिया बाहेर पडल्या. या चार वर्षांत द्रव्याची मदत चांगलीच झाली व विद्यापीठाची शिल्लक दोन लाखांवर गेली.

# प्रकरण एकविसावें

## महिलाविद्यापीठाचें वैशिष्ट्य

इतर युनिव्हर्सिट्यांहून ही स्त्रियांची युनिव्हर्सिटी म्हणजे महिलाविद्यापीठ कोणत्या गोष्टींत भिन्न आहे, त्याचा निर्देश करणें जरूर आहे. महिलाविद्यापीठ ह्या नांवावरूनच स्त्रियांच्या दृष्टीने विचार करून योग्य दिसेल तो अभ्यासक्रम यांत ठेवण्याचा हेतु स्पष्ट दिसतो. म्हणूनच प्रपंचशास्त्र आणि आरोग्यशास्त्र हा विषय सर्व परिक्षांतून आवश्यक ठेवला आहे. ह्या विषयाच्या अंगत्वानेच वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, शरीररचनाशास्त्र, इंद्रियविज्ञानशास्त्र, मानसशास्त्र व विशेषतः मुलांच्या मनोव्यापारांची मीमांसा ह्या विषयांचीं मूलतत्त्वें शिकविलीं जातात. समाजशास्त्र हा विषय आवश्यक ठेवला आहे व गायनवादन आणि चित्रकला हे विषय हायस्कुलांत तर आहेतच पण कॉलेजांत देखील ऐच्छिक विषयांच्या यादींत त्यांचा समवेश केला आहे.

पुरुषांना व स्त्रियांना सारखेच नडणारे दोषही ह्या विद्यापीठांतून काढून टाकण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या शिक्षणपद्धतींतील मोठा दोष, जो जगांत दुसऱ्या कोठेही सापडणार नाही तो, म्हटला म्हणजे इंग्रजी भाषेला दिलेलें फाजील महत्त्व व मातृभाषेची हेळसांड हा होय. एखाद्या देशाची अगर प्रान्ताची भाषा परकी भाषेसारखी शास्त्रीय विचार व्यक्त करण्याइतकी प्रगल्भ दशेस आली नाही म्हणून उच्च शिक्षणाच्या बाबतींत तिचा बोध-भाषा म्हणून उपयोग न करतां त्या परकी भाषेचा करावा असें प्रतिपादन करणें धोक्याचें आहे. जपानने जर हा धोक्याचा मार्ग स्वीकारला असता तर आज तेथे जी सर्वांगीण उन्नति होऊन सर्व राष्ट्र साक्षर झालेलें आहे तें कितपत शक्य झालें असतें, ह्याबद्दल शंका आहे. उच्च शिक्षणांत देखील मातृभाषेला बोधभाषा करणें—अर्थात् मातृभाषेंतून सर्व विषय शिकवणें—हा ह्या विद्यापीठाचा विशेष आहे. ह्याशिवाय मातृ-

भाषेच्या वाङ्मयाच्या अभ्यासाला पहिलें स्थान देऊन इंग्रजी भाषेच्या अभ्यासाला दुसरें स्थान दिलें आहे. अशा रीतीनें ह्या विद्यापीठानें इंग्रजीनें बळकावलेलें देशी भाषांचें स्थान त्यांचें त्यांना मिळवून दिलें आहे. तथापि अनेक दृष्टींनीं विचार केला असतां इंग्रजी भाषेशीं चांगला परिचय होणें जरूर आहे हें कळून येईल. उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थिनींना ज्ञानाचे दरवाजे मोकळे झाले पाहिजेत. आज तरी इंग्रजी किंवा दुसऱ्या कोणत्या तरी युरोपिअन भाषेवाचून हें होऊं शकत नाही. इंग्रजी भाषा ही आज अर्ध्या जगाची भाषा झाली आहे. कोणत्याही विषयाचें विशेष ज्ञान करून घ्यावयाचें असलें अगर कोणत्याही गोष्टीची विशेष माहिती पाहिजे असेल तर ती आज इंग्रजीच्या ज्ञानावाचून होणें शक्य नाही. फार काय, आपल्या देशांतील पुढाऱ्यांचीं भाषणें प्रत्यक्ष ऐकणें अगर त्यांच्याशीं संभाषण करणें तेंही इंग्रजीवाचून आज होऊं शकत नाहीं. कॉलेजांत शिकावयाच्या कित्येक विषयांवर मातृभाषेंत असावीं तशीं पुस्तकें उपलब्ध नाहीत. अशा विषयांच्या अभ्यासासाठीं इंग्रजी पुस्तकें नेमण्यांत येतात व तीं विद्यार्थिनींना वाचावीं लागतात. अर्थात विषय मातृभाषेंतून समजाविला जातो व परीक्षेच्या प्रश्नांचीं उत्तरें मातृभाषेंतूनच लिहावीं लागतात. तरी जरूर पडेल तेव्हा इंग्रजी भाषेचा उपयोग करतां यावा इतकें इंग्रजीचें ज्ञान अवश्य पाहिजे व ही गोष्ट हायस्कूलच्या आरंभापासून कॉलेजाच्या अखेरीपर्यंत इंग्रजी हा विषय आवश्यक ठेवून साधली आहे.

गणित विषयाची नावड असल्यामुळे ज्यांचीं नापास होण्यानें दोन-तीन वर्षें फुकट जातात असे बरेच विद्यार्थी सापडतील. विद्यार्थिनींचीं अशीं वर्षें फुकट गेलीं तर त्यांना मध्येच अभ्यास थांबवण्याची वेळ येते. लग्नाच्या पूर्वी जेवढा वेळ सापडेल तेवढ्याचा चांगला उपयोग करून घेतां आला पाहिजे, ही गोष्ट मुलींचा अभ्यासक्रम ठरवतांना लक्षांत घेणें जरूर आहे. ह्या विद्यापीठांत अंकगणित हा विषय आवश्यक आहे, पण बीजगणित व भूमिति यांची थोडीशी ओळख प्रवेश-परीक्षेपूर्वी करून

दिली जाते इतकेंच. परीक्षेला हे विषय आवश्यक नाहीत. ह्या विषयांत गम्य असल्यास हे घ्यावे नाही तर त्यांच्याऐवजी दुसरे घ्यावे. अंक-गणितापलीकडे गणित विषय फारसा न शिकतां महिलाविद्यापीठांत पदवीधर होतां येतें.

कॉलेजांत न जातां घरीं अभ्यास करूनहि ह्या विद्यापीठाच्या परीक्षा देतां येतात व पदवीधरहि होतां येतें. माध्यमिक व उच्च शिक्षण स्त्रियांच्या आटोक्यांत आणून देणें हा ह्या विद्यापाठाचा एक हेतु आहे. परीक्षेसाठी लांबच लांब प्रवास करून विद्यार्थिनींना परीक्षेच्या ठिकाणीं जावें लागतें. हा त्रास चुकविण्यासाठी ज्या ठिकाणीं पांच विद्यार्थिनी असतील त्याच ठिकाणीं त्यांची परीक्षा घेतली जाण्याची व्यवस्था करण्यांत येते. ह्यापेक्षा कमी विद्यार्थिनी असल्या तर त्यांचे पालक अगर तेथील शाळेचे पालक खर्चाचा बराच भाग देण्यास तयार असल्यास त्यांची परीक्षा त्या ठिकाणीं घेतली जाते.

सरकारी व निमसरकारी युनव्हर्सिट्यांनी आपल्या पदव्यांचीं निदर्शक नांवें पाश्चात्य युनिव्हर्सिट्यांनी पुरुषांसाठी योजिलेलींच कायम ठेवलीं आहेत. स्त्रियांना हीं अनुरूप नसतांहि त्याच पदव्या दिल्या जातात. ह्या विद्यापीठाने स्त्रियांना अनुरूप अशीं पदव्यांचीं नांवें योजलीं आहेत. बी. ए. च्या बरोबरीच्या पदवीला 'गृहीतागमा'—जी. ए. (Graduate in Arts) व एम्. ए. च्या बरोबरीच्या पदवीला 'प्रदेयागमा'—पी. ए. (Proficient in Arts) अशीं नांवें दिलीं आहेत.

ह्या विद्यापीठाचा उच्च शिक्षणाचा अभ्यासक्रम तीनच वर्षांचा ठेविला आहे. मुंबई युनिव्हर्सिटींत पहिलीं तीस वर्षे तीनच वर्षांचा अभ्यासक्रम होता. येथील स्त्रियांची विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेऊन व मातृभाषेंतून शिक्षण दिलें गेल्यामुळे बहुश्रुतपणांत व मनावर संस्कार होण्याच्या दृष्टीने इतर युनिव्हर्सिट्यांचे पदवीधर व विद्यापीठाच्या पदवीधर ह्यांत फरक दिसणार नाही, ह्या विचाराने एक वर्ष कमी केलेलें आहे.

इंग्रजी भाषेला फाजील महत्त्व न देतां कमी श्रमाने मातृभाषेंतून स्त्रियांना ज्ञान मिळवण्याचीं साधनें उपलब्ध करून द्यावीं या दृष्टीने विद्यापीठाचे जोराचे प्रयत्न व्हावे अशी माझी इच्छा आहे. मनावर संस्कार होण्याच्या दृष्टीने अगर बहुश्रुतपणाच्या दृष्टीने ह्या विद्यापीठाची प्रवेशपरीक्षा पास झालेल्या विद्यार्थिनी इतर युनिव्हर्सिट्यांतून मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झालेल्या विद्यार्थिनींहून कमी नसाव्या व त्या तशा नाहीतहि असें मला वाटतें. त्याचप्रमाणे आमच्या 'गृहीतागमा' सामान्य पद्वी (Pass degree) मिळविलेल्या बी. ए. स्त्रियांपेक्षा कमी नाहीत असें म्हणण्यास मला शंका वाटत नाही.

वर्तमानपत्रांतून अगर मासिकांतून लेख लिहिणें, सभांतून भाषणें करणें, आपल्या जबाबदारीवर कांही कामें अंगावर घेऊन तीं चालवणें, वगैरे गोष्टींत महिलाविद्यापीठाच्या पद्वीधर स्त्रिया इतर विद्यापीठांच्या पद्वीधर स्त्रियांहून रतिमात्र कमी पडणार नाहीत; किंबहुना ह्या कामीं मातृभाषेचा विशेष अभ्यास झाल्याने व सर्व विषय मातृभाषेंतून शिकल्याने महिलाविद्यापीठाच्या पद्वीधरांनाच या कामीं अधिक पात्रता येऊं शकेल. इंग्रजींतून सर्व विषय शिकून व पुरुषांप्रमाणेच सर्व शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या मुंबई युनिव्हर्सिटीच्या हिंदु पद्वीधर स्त्रियांनी इंग्रजी भाषणें केलीं आहेत अगर लेख लिहिले आहेत असें फारसें आढळत नाही. मनावर संस्कार होण्याच्या व उपयुक्ततेच्या दृष्टीने महिलाविद्यापीठाचें शिक्षणच अधिक परिणामकारक होईल व होतें असें माझें ठाम मत आहे.

अलिकडे माध्यमिक शाळांकरिता चांगल्या शिक्षकिणी मिळाव्या म्हणून विद्यापीठाने डिप्लोमा इन् टीचिंग (माध्यमिक शाळांतील शिक्षकांच्या पात्रतेबद्दल प्रशस्तिपत्र) ची परीक्षा ठेविली असून अभ्यासक्रम आखला आहे. जी. ए. झाल्यानंतर दोन वर्षें योग्य शिक्षकांच्या देखरेखीखाली चाललेल्या शाळांत प्रत्यक्ष शिकवण्याचें काम केल्यावर या परीक्षेला बसतां येतें. आमच्या विद्यापीठाच्या पद्वीधर स्त्रियांना या परीक्षेचा फायदा घेऊन शिक्षणाच्या क्षेत्रांत चांगलें काम करतां येईल.

# प्रकरण बाविसावें

## महिलाविद्यापीठाचा विस्तार

विद्यापीठाचें पाऊल हळू हळू पण निश्चितपणें पुढे पडूं लागलें होतें. विद्यार्थिनी थोड्या होत्या खऱ्या पण त्यांतल्या बऱ्याच निवडक असून उच्च ध्येयाने आपल्या येण्यामुळे विद्यापीठाला मदत व्हावी म्हणून स्वार्थ-त्याग करून आल्या होत्या. त्यावेळीं विद्यापीठाच्या कॉलेजांत येणें, हें एक प्रकारचें दिव्य होतें. आरंभीं येवढ्या तरी विद्यार्थिनी मिळाल्या, हें विद्यापीठाचें भाग्यच होतें व ह्यामुळे लोकमत अनुकूल होण्यास मदत झाली. त्याचप्रमाणे विद्यापीठाचें धोरण पटून स्वार्थत्यागाने ह्या कार्याला वाहून घेण्यासाठी मंडळी पुढे येऊं लागली.

हिंगण्याला महिलापाठशाळा, महिलाश्रम व अध्यापिकाशाळा सुरू झाल्यावर पुढे लवकरच पुण्यांत विद्यापीठाचें हायस्कूल असावें ह्या हेतूने गो. म. चिपळुणकर यांनी कन्याशाळा काढून पहिल्या तीन इयत्ता सुरू केल्या. ह्याप्रमाणे कामाचा जम बसत चालला होता व द्रव्याची मदतही बरीच मिळूं लागली होती. ठाण्याचे सुप्रसिद्ध नागरिक विनायकराव भावे यांनी आपल्या मातोश्रींचें नांव कॉलेजला देण्याच्या अटीवर पन्नास हजारांची देणगी देऊं केली व आश्रमाच्या व्यवस्थापक मंडळीने तिचा स्वीकार करण्याचें ठरवून त्यांस तसें कळवलेंही होतें. फक्त रकम हातीं येण्याचें राहिलें होतें. कॉलेज आश्रमाने चालवलें होतें व तें पुढे चाल-विण्याची जबाबदारी आश्रमावरच होती. युनिव्हर्सिटीकडून आश्रमाला कांहीं मदत मिळत होती येवढेंच. त्यामुळे आश्रमाने आपल्या जबाब-दारीवरच ह्या देणगीचा स्वीकार करण्याचें ठरवलें, हें साहजिकच झालें. ह्या भावी मदतीच्या आशेने आम्ही आनंदून गेलों पण विधिघटना कांहीं वेगळीच होती.

हें प्रकरण तडीला लागण्यापूर्वीच ठाकरसींच्या देणगीची योजना पुढें आली व विद्यापीठाच्या कॉलेजला आपल्या मातोश्रींचेंच नांव देण्याचा ठाकरसींनी आग्रह धरल्यामुळे आश्रमाच्या मंडळीला मोठा पेच येऊन पडला. आश्रमाने आपलें कॉलेज स्वतंत्रपणें चालवावें व युनिव्हर्सिटीने दुसरें कॉलेज काढावें, हें शक्य नसल्यामुळे आश्रमाला आपलें कॉलेज विद्यापीठाच्या स्वाधीन करावें लागलें व त्याला ठाकरसींच्या मातोश्रींचे नांव दिलें जाऊन चालत आलेली पहिली देणगी नाकारावी लागली.

सर विठ्ठलदास ठाकरसी यांच्या मनांत आमच्या युनिव्हर्सिटीविषयीं विशेष प्रेम उत्पन्न होण्याला जें कारण घडलें, तें अनपेक्षित गोष्टींपैकींच होय. आमच्या विद्यापीठाला जरी त्यांनी हजार रुपये दिले होते तरी त्या वेळीं त्यांना आमच्या कार्याची खरी पारख झालेली नव्हती. ती होण्याचा सहज योग आला. १९१९ सालीं त्यांनी लेडी ठाकरसी व कांही मित्रमंडळी यांजबरोबर निरनिराळया देशांत व्यापारी दृष्टीने कांही माहिती मिळविण्यासाठी पृथ्वीप्रदक्षिणा केली. त्यावेळीं टोकिओ शहरीं जपानी स्त्रियांची युनिव्हर्सिटी त्यांनी पाहिली. तेथील काम त्यांना फारच आवडलें. त्या वेळीं आश्रमाला अगोदरच येऊन मिळालेल्या सीताबाई अण्णिगेरी ह्या माझ्या शिफारशीने लेडी ठाकरसींची सहचरी (कंपॅनिअन्) म्हणून त्या मंडळीबरोबर गेल्या होत्या. त्यांच्याकडून जपानी नमुन्यावरच आमचें विद्यापीठ स्थापन झालें आहे व मला स्फूर्ति जपानी स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीकडूनच मिळाली असून स्वार्थत्यागाने या कार्याला वाहून घेतलेली चार पाच कर्तृत्ववान मंडळी ह्या कार्याच्या पाठीशीं आहेत, ही सर्व माहिती ठाकरसींना मिळाली.

जपानांतली युनिव्हर्सिटी पाहिल्यापासून आपल्या देशांत अशी युनिव्हर्सिटी असावी असे विचार त्यांच्या मनांत येऊं लागलेच होते. नंतर ही विद्यापीठाची हकीकत ऐकल्यावर त्यालाच आपण भरपूर साह्य दिलें तर ह्याजकडूनहि मोठें कार्य घडून येण्याचा संभव आहे असें त्यांना वाटूं लागलें. हिंदुस्थानांत परत आल्यावर त्यांनी आपला हा हेतु मला कळ-

वला. नंतर रँगलर परांजपे, प्रोफेसर केशवराव कानिटकर व मी ह्यांच्याशीं दोन तीन वेळां चर्चा करून त्यांनी आपली योजना तयार केली व ती थोड्याशा फरकाने सेनेटमध्ये मंजूर झाली.

पंधरा लाख रुपये दर्शनी किंमतीच्या शेकडा साडेतीन टक्के व्याजाच्या प्रॉमिसरी नोटा त्यांच्या अटी पुऱ्या होतील तेव्हा त्यांनी विद्यापीठाला द्याव्या व तोपर्यंत त्यांचें व्याज दरसाल साडेबावन हजार रुपये चालू खर्चासाठी द्यावें, असें उभयतांच्या विचारें ठरलें. ह्या देणगीने विद्यापीठाचें दैन्य गेलें व त्याच्या विस्ताराला अनुकूल परिस्थिति उत्पन्न झाली. आश्रमाने चालविलेलें कॉलेज व चिपळूणकरांनी काढलेली पुण्यांतली कन्याशाळा हीं विद्यापीठाच्या स्वाधीन करण्यांत आलीं व लवकरच कन्याशाळेला पूर्ण हायस्कूलचें स्वरूप आलें. कॉलेजसाठी शहराजवळ जागा घेऊन इमारत बांधण्याचें सर विठ्ठलदासांच्या मनांत आलें व त्यासाठी जमलेल्या फंडाला हात न लावतां एक लक्ष शायशी हजार रुपये बिनव्याजी द्यावे व नवीन देणग्यांतून ते फेडले जावे, असें त्यांनी ठरवलें. ज्या कॉलेजच्या इमारतींचे प्लॅन आपल्या देखरेखीखालीं करवले व जी बांधण्याचें काम त्यांनी आपल्या विश्वासाच्या व ज्याने 'पर्णकुटी' बांधली त्या काँट्रॅक्टरला दिलें व जीवर त्यांची स्वतःची देखरेख असे ती इमारत पुरी झालेली पाहण्याला ते दुर्दैवाने जगले नाहीत.

विद्यार्थिनींच्या वस्तीगृहासाठी मुंबईचे शेट मूळराज खटाव यांनी पस्तीस हजारांची देणगी दिली व तींत भर घातली जाऊन 'खटाव मकनजी वसतीगृह' तयार झालें. पूर्व आफ्रिकेंतील जिंजा येथील डॉ. लांडे यांच्या कांहीं अटींवर दिलेल्या चाळीस हजारांच्या देणगीमुळे 'विठ्ठल राघोबा लांडे बिल्डिंग' पुण्यांतल्या कन्याशाळेला मिळालें. अहमदाबाद व सुरत ह्या ठिकाणीं खाजगी प्रयत्नांनी हायस्कुलें निघालीं व अहमदाबादेला लवकरच कॉलेज निघालें व हीं सर्व विद्यापीठाला जोडलीं गेलीं. पुढे विद्यापीठाने आपल्या जबाबदारीवर मुंबईंत हायस्कूल काढलें व अडीच वर्षांपूर्वी कॉलेजही काढलें. ठाकरसींच्या अटींप्रमाणे विद्यापीठाला त्यांच्या

मातोश्रींच्या स्मरणार्थ ‘श्रीमती नाथीबाई दामोधर ठाकरसी भारतवर्षीय महिला विद्यापीठ’ असें नांव देण्यांत आलें आणि पुण्यांतील आणि मुंबईतील शाळा कॉलेजें ह्या सर्वांनाही अशाच प्रकारचीं नांवें देण्यांत आलीं.

अशा तऱ्हेने ठाकरसींच्या देणगीमुळे विद्यापीठाला स्थैर्य येऊन त्याचा आश्रमाशीं असलेला प्रत्यक्ष संबंध जरी सुटला तरी विद्यापीठाच्या संस्था चालविण्याची व त्याचें कार्यक्षेत्र वाढविण्याची नैतिक जबाबदारी आश्रमावरच होती, व ती अजूनहि बऱ्याच अंशीं आहे. ही जबाबदारी पार पाडण्यास मदत करण्यासाठी बऱ्याच लायक स्त्रीपुरुषांना आश्रमाचे आजन्म सेवक करून घ्यावें लागलें.

हा सर्व जम बसत असतांना माझें हिंदुस्थानभर हिंडून विद्यापीठाचा प्रसार करणें व त्यासाठी द्रव्यसाहाय्य मिळवणें हें काम चालूच होतें. शिवाय विद्यापीठाच्या विस्तारासाठीहि कांही काम करणें अवश्य होतें. आरंभी गृहीतागमा झालेल्या विद्यार्थिनींपैकी ज्यांची स्वार्थत्यागाने काम करण्याची तयारी होती त्यांच्या सल्ल्याने सातारा, सांगली, बेळगांव ह्या ठिकाणीं स्थानिक लोकांच्या मदतीने पहिल्याने एक दोन वर्गच सुरू करून व दरवर्षी एकेक वर्ग वाढवून पूर्ण हायस्कुलें बनाविण्यांत आलीं व तीं विद्यापीठाला जोडण्यांत आलीं. आरंभी कांही वर्षे ह्या ठिकाणीं लोकांस उत्तेजन देण्यासाठी व त्या हायस्कुलांकरिता वर्गणी जमविण्याच्या कामीं मदत करण्यासाठी मला जावें लागे. अशाच रीतीने वाईचें मिड्ल्स्कूल स्थापन होऊन तें विद्यापीठाला जोडलें गेलें.

इतरही बऱ्याच ठिकाणीं विद्यापीठाच्या पदवीधर स्त्रियांच्या मदतीने स्थानिक मंडळींनी हायस्कुलें व मिड्ल्स्कुलें काढून तीं विद्यापीठाला जोडलीं ह्यांतल्या कांहींना विद्यापीठांतून मदत मिळते, परंतु द्रव्याच्या अडचणीमुळे कांहींना मिळत नाही. अशा रीतीने विद्यापीठाचें प्रत्यक्ष कार्य भावनगर, सिंध हैद्राबाद, दक्षिण हैद्राबाद, नागपूर आणि सागरपर्यंत गेलें आहे. विद्यापीठाची प्रवेशपरीक्षा सोळासतरा केंद्रांतून घेतली जाते. पूर्ण माध्यामिक शिक्षणाची सोय मराठी, गुजराथी, तेलगू व सिंधी ह्या चार

भाषांत झालेली आहे आणि उच्च शिक्षण मिळण्याची सोय मराठी, गुजराथी व सिंधी ह्या भाषांत झालेली आहे. शिवाय खासगी अभ्यास करून हिंदी व बंगाली मातृभाषा असलेल्या कांही विद्यार्थिनी ह्या विद्यापीठाच्या परीक्षांना बसलेल्या आहेत व अजूनही बसतात.

आजपर्यंत विद्यापीठांतून पांच प्रदेयागमा बाहेर पडल्या आहेत. त्यांपैकी गोदूबाई केतकर हिचा 'भारतीय नाट्यशास्त्र' हा निबंध व बाळूबाई खरे हिचा 'अलंकार-मंजूषा' हा निबंध हे पुस्तक रूपाने बाहेर पडले आहेत व त्यांनी मराठी वाङ्मयांत चांगली भर पडली आहे, असें तज्ञांचें मत आहे. आजपर्यंत गृहीतागमा झालेल्यांची संख्या ११३ असून त्यांपैकी सुमारें ५० स्त्रियांच्या हायस्कुलांतून शिक्षणाचें काम करीत आहेत. सहा पदवीधर स्त्रियांनी पाश्चात्य देशांत जाऊन अधिक शिक्षण घेतलें आहे. ५६० विद्यार्थिनी विद्यापीठाची प्रवेश परीक्षा ( मॅट्रिक्युलेशन) पास होऊन गेल्या आहेत. आध्यापिकाशाळेंतून शेवटचें सर्टिफिकेट मिळवलेल्या सत्तर स्त्रिया प्राथमिक शाळांतून शिक्षणाचें काम करीत आहेत व ४२ स्त्रिया ह्या कामासाठी तयार होत आहेत. पुणे, अहमदाबाद, बडोदे व मुंबई, येथील चार पूर्ण कॉलेजें व सिंध हैद्राबाद येथील पुढल्या वर्षी पूर्ण होणारें कॉलेज मिळून पांच कॉलेजांत १५५ विद्यार्थिनी उच्च शिक्षणाचा लाभ घेत आहेत व विद्यापीठाला जोडलेलीं सतरा हायस्कुलें आणि तीन मिड्ल् स्कुलें ह्यांत २६०० विद्यार्थिनी माध्यमिक शिक्षण घेत आहेत.

शक्य तोवर अभ्यासक्रम ठरविण्याच्या बाबतींतील स्वातंत्र्य न घालवतां सरकारी मान्यता मिळेल तेवढी मिळवावयाची हा विद्यापीठाचा हेतु आहे. विद्यापीठाला जोडलेल्या बऱ्याच हायस्कुलांना एक प्रकारची सरकारी मान्यता मिळून त्यांना सरकारकडून वार्षिक मदत मिळते. कांही ठराविक विषय ऐच्छिक घेऊन ज्या विद्यार्थिनी प्रवेशपरीक्षा पास होतील त्यांना मेडिकल स्कुलांत एल्. सी. पी. एस्. च्या परीक्षेचा अभ्यास करण्यासाठी प्रवेश मिळूं शकतो. ही विद्यार्थिनींची मोठी सोय झाली

आहे. त्याचप्रमाणे अध्यापिकाशाळेलाही कांही अटींवर सरकारी मान्यता मिळाली आहे व अध्यापिकाशाळेंतून तीन वर्षांचा अभ्यासक्रम पुरा करून पास झालेल्या शिक्षकिणींना सरकारी ट्रेनिंग कॉलेजांतून पास होऊन निघालेल्या शिक्षकिणींचाच दर्जा मिळतो.

अशा रीतीने विद्यापीठाचा जम चांगल्या रीतीने बसत चालला असतां विद्यापीठावर एकदम आकाशाची कुऱ्हाड येऊन पडली व विद्यापीठाच्या चालकांच्या कसोटीची वेळ आली. ठाकरसी इस्टेटीच्या ट्रस्टींनी विद्यापीठाने अटी पुऱ्या केल्या नाहीत व त्याजकडून त्या पुऱ्या होण्याची आशा नाही, असें कारण सांगून दरसाल साडेबावन हजार रुपये देण्याचें पावणेदोन वर्षांपूर्वी बंद केलें. ठाकरसींच्या अटी व्याज देण्याला लागू नसून फक्त मुद्दल देण्यालाच लागू आहेत, असा आमचा समज होता व अजूनही आहे. परंतु ट्रस्टींनी तसें वाटत नसल्यामुळे त्यांनी व्याज देण्याचें नाकारलें. विद्यापीठाचा वार्षिक खर्च सत्तर-बहात्तर हजार, त्यांतले साडेबावन हजार गेल्यावर जमेचीं व खर्चाचीं तोंडें कशीं मिळवावयाचीं, हा मोठा प्रश्न येऊन पडला. प्रसंगाला तोंड देण्यावाचून गत्यंतर नव्हतें. अर्थात् सर्व मंडळी तयार झाली. कॉलेजांतील प्रोफेसरांचा पगार दरमहा सव्वाशें होता तो पाऊणशे करण्यांत आला. विद्यापीठाला जोडलेल्या शाळा-कॉलेजांची वार्षिक मदत निम्मी करण्यांत आली आणि इतर ठिकाणीहि शक्य तितकी काटकसर करून सर्व व्यवहार पूर्ववत चालविण्यांत येत आहेत. साडेबावन हजारांचा प्रश्न कसा सुटेल हें आज सांगतां येत नाही. धर्मादायासाठी मुंबईत जे ट्रस्ट केलेले असतात, त्यांचें काम बरोबर चालतें की नाही हें पाहण्याचा अधिकार ॲडव्होकेट जनरल म्हणून एक अधिकारी मुंबईस असतो त्याला आहे. त्यांनी हें प्रकरण हातांत घेतलें असून त्यांच्याकडून ह्या प्रकरणाचा निकाल लागेल.

आपणावर प्रसंग यावे अशी कधी कोणी इच्छा करीत नाही. परंतु प्रसंग आल्यामुळे पुष्कळ वेळां मनुष्यांची व तीं जें कार्य करीत असतील त्याची कसोटी लागते. ह्या प्रसंगाने विद्यापीठासंबंधाने लोकमत कसें

आहे व लोकांचा त्यावर कितपत विश्वास बसला आहे त्याची पारख झाली. हल्लीच्या मंदीच्या काळांत देखील ह्या प्रसंगीं लोकांकडून मदत चांगली होत आहे. पण लोकमताची ही खरी कसोटी नव्हे. विद्यापीठाचा फायदा घेण्याला किती मुलींचे पालक तयार होत आहेत, हें पाहिलें पाहिजे. विद्यापीठाला ठाकरसींची मदत मिळून आठ वर्षें झालीं तरी विद्यार्थिनींची संख्या बेताबाताचीच होती. गेल्या पांच वर्षांत विद्यार्थिनीं-च्या संख्येची वाढ विशेष झाली आणि आनंदाची गोष्ट ही की, ठाकरसीं-ची मदत बंद झाल्यावर गेल्या दीडवर्षांत ही अधिक प्रमाणांत झाली, आणि ह्या प्रसंगामुळे कॉलेजची व सर्व परीक्षांची फी दुप्पट झाली असतांहि ती झाली, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. एवढा मोठा आधार नाहीसा झालेला पाहून विद्यापीठाचें आता कसें होणार, ह्याबद्दल लोकांना शंका वाटून विद्यार्थिनींची संख्या घटण्याचा संभव विशेष होता. तसें न होतां ती वाढली ह्यावरून लोकांना विद्यापीठाची गरज भासत आहे व त्यावर लोकांचा विश्वास अधिकाधिक बसत चालला आहे, ही गोष्ट स्पष्ट होते.

# प्रकरण तेविसावें

## पृथ्वीपर्यटन

प्रवास करण्यांत अनेकांचे अनेक हेतु असतात. आपल्या देशांत जुन्या विचारांचे लोक धार्मिक बुद्धीने पुण्यक्षेत्रांच्या ठिकाणीं देवांचें दर्शन घ्यावें व तीर्थांच्या ठिकाणीं स्नान करावें, ह्या हेतूने यात्रा करीत असतात. नवीन विचारांचे स्त्रीपुरुष सृष्टीचें अवलोकन करावें, रम्य क्षेत्रें पाहावीं किंवा सूक्ष्म दृष्टीने समाजाचें निरीक्षण करून ठिकठिकाणच्या चालीरीतींची माहिती करून घ्यावी, अशा उद्देशाने प्रवास करतात. माझ्या प्रवासांत वरील कोणतेहि हेतु नव्हते. महिलाविद्यापीठाच्या कार्याचा प्रचार करणें व त्यासाठीं द्रव्यसाहाय्य मिळालें तर मिळवणें, हा माझ्या प्रवासाचा मुख्य हेतु होता. साधल्यास पाश्चात्य देशांतील स्त्रियांचीं हायस्कुलें व कॉलेजें पाहून त्यांपासून आपल्याला कांहि बोध घेतां येईल की काय हें पाहावें, असेंही मनांत होतें.

मी परदेशांत प्रवास करीन, ही कल्पना प्रत्यक्ष त्या प्रवासाला निघण्यापूर्वी दोन महिनेपर्यंत माझ्या स्वप्नांतही कधी आली नाही. १९२९ च्या जानेवारीच्या अखेरीस ही कल्पना माझ्या मनांत आली. कांही अमेरिकन शिक्षकांच्या खटपटीने सर्व जगांतील शिक्षकांच्या संघांच्या व शिक्षणसंस्थांच्या प्रतिनिधींची परिषद् दर दोन वर्षांनी एकदा भरण्याची सुरुवात झाली होती. ह्या परिषदेचें अधिवेशन १९२९ सालीं जुलैच्या अखेर स्वित्झर्लंडांत जिनीव्हा शहरीं भरण्याचें ठरलें होतें. जगांतील शिक्षकांमध्ये प्रेमभाव वाढावा व शिक्षणविषयक प्रश्नांवर निबंध वाचले जाऊन त्या प्रश्नांचा ऊहापोह व्हावा हा ह्या परिषदेचा हेतु होता. त्याचप्रमाणे कांही इंग्रज शिक्षक शिक्षकिणींच्या प्रयत्नांनी शिक्षणाच्या नवीन ध्येयाचा विचार करण्यासाठी स्थापन झालेल्या परिषदेचें अधिवेशन डेन्मार्क देशांतील एल्सिनोर शहरीं ऑगस्टच्या आरंभीं भरण्याचें

ठरलें होतें. ह्या अधिवेशनांच्या तारखा अशा बेताने ठरविण्यांत आल्या होत्या की, प्रतिनिधींना एक अधिवेशन आटपून दुसऱ्या अधिवेशनासाठी जातां यावें. ह्या परिषदांसाठी जगांतील अनेक देशांतले शिक्षक एकत्र जमावयाचे होते. ह्या अधिवेशनांचा फायदा घ्यावा व यूरोपांतल्या कित्येक देशांत जे पुष्कळसे हिंदी विद्यार्थी आहेत त्यांमध्ये विद्यापीठाचा प्रचार करून द्रव्यसाहाय्य मिळविण्याचा प्रयत्न करावा, असा विचार मनांत आला. शिवाय युरोपिअन लोकांमध्येही हिंदी स्त्रियांच्या शिक्षणाबद्दल चाललेल्या प्रयत्नांची व्याख्यानरूपाने माहिती देण्याची संधि मिळण्याचा संभव होता. तेव्हा विद्यापीठाने खर्च देण्याचें कबूल केल्यास ह्या कामीं पुढे पाऊल टाकावें, असें मनाने घेतलें. विद्यापीठाच्या नियामक-मंडळाने माझी विनंती मान्य केली व खर्चासाठी पांच हजार रुपये मंजूर केले.

विद्यापीठाच्या प्रचार-कार्यासाठी व वर्गणीसाठी मीं हिंदुस्थानांत पुष्कळ प्रवास केला व तो एकट्यानेच केला आणि अजूनहि मी तो कारणपरत्वें तसा करीत आहें. परंतु परदेशांतील प्रवासाची गोष्ट वेगळी होती. आपल्या देशांत भाषेची अडचण विशेष नाही; परदेशांत ती अडचण. माझ्या अंगांत एक प्रकारची तरतरी, बोलकेपणा व लवकर नव्या ओळखी करून घेण्याची कला नसल्यामुळे बरोबर कोणीतरी असल्या-शिवाय मला हा परदेशांतील प्रवास शक्य नव्हता. शिवाय माझें वय एकाहत्तर वर्षांचें झालेलें, तेव्हा वेळेवर अनेक प्रकारांनी उपयोगी पडेल, असें मनुष्य बरोबर घेण्याचें मीं ठरवलें. सुदैवाने माझा मुलगा भास्कर त्या वेळीं इंग्लंडांत लीड्स् येथील युनिव्हर्सिटींत अभ्यास करीत होता. त्याचा अभ्यास पुरा होऊन तो मे १५ तारखेच्या सुमारास मोकळा होणार होता. तो रिकामा झाल्यावर त्याला बरोबर घ्यावा व तोपर्यंत त्या वेळीं पारिस येथे अभ्यास करीत असलेले हरिभाऊ दिवेकर किंवा बर्लिन येथे असलेली माझी सून इरावती ह्यांपैकी कोणाच्या तरी मदतीने काम करावयाचें ठरवून कपड्यांची व पासपोर्टची ( निरनिराळ्या देशांत

प्रवास करतांना लागणारा मूळच्या देशांतील सरकारचा परवाना) वगैरे सर्व तयारी करून तारीख १६ मार्च १९२९ रोजीं मी पी. अँड ओ. कंपनीच्या ‘ रावळपिंडी ’ बोटीवर पाय ठेवला. येथून जातांना कमळाबाई देशपांडे मजबरोबर होत्या. इंग्लंडांत पोचल्यावर ८-१० दिवस मजबरोबर राहून नंतर अभ्यासाच्या दृष्टीने त्यांनी आपला कार्यक्रम आखला.

माझ्या प्रवासांत किती दिवस कोणत्या गावीं गेले, हें समजावें म्हणून एक तक्ता सरतेशेवटी जोडला आहे त्यावरून कित्येक ठिकाणीं आमचा प्रवास कसा गर्दीचा होत होता, याची कल्पना येईल. विशेषतः अमेरिकेंत बराचसा प्रवास रात्रीं करून दिवसाचा भरपूर उपयोग करून घ्यावा लागला. कांहीं दिवशीं तर ३-४ व्याख्यानें, चहा जेवणाचीं निमंत्रणें आणि शैक्षणिक संस्थांना भेटी असा भरगच्च कार्यक्रम आखणें भाग पडत असे.

माझ्या प्रवासांत आलेल्या कांहीं अनुभवांचा समावेश पुढील तीन चार प्रकरणांत करावयाचा आहे. मला व्यक्तिशः आलेले अनुभव व इतर मंडळींशीं केलेल्या संभाषणांवरून माझे झालेले ग्रह यांचा समावेश साहजिकच ह्या प्रकरणांत होईल. त्यांत अपुऱ्या माहितीमुळे किंवा संकुचित निरीक्षणामुळे कांहीं किरकोळ चुका असण्याचा संभव आहे, हें वाचकांनी लक्षांत ठेवलें पाहिजे.

# प्रकरण चोविसावें

## यूरोपच्या प्रवासांतील कांही गोष्टी

मला आगबोट मुळीच लागत नसल्यामुळे व खाणेंपिणेंहि भरपूर असल्यामुळे मला समुद्रावरील सफरीचा बिलकुल त्रास झाला नाही. आगबोटींतून उतरल्यापासून कोणी तरी तिकडील माहितगार मनुष्य मजबरोबर असावें, अशी व्यवस्था मीं अगोदरपासूनच करून ठेवली होती. आम्ही फ्रान्समधील मार्सेल्स बंदरांत उतरून पारिसच्या मार्गानें लंडनला गेलों. पहिले साडेतीन महिने लंडन हें माझें मुख्य ठिकाण होतें. दोन तीन आठवडे फिरून यावें, लंडनमध्ये आठदहा दिवस राहावें व पुन्हा कोठे तरी जावें, असें चाललें होतें. ह्या रीतीनें इंग्लंड-मधील आठ दहा शहरें, फ्रान्समधील पारिस, आयर्लंडमधील डब्लिन व स्कॉटलंडांतील ग्लासगो व एडिंबरो ह्या ठिकाणचें काम आटपून आम्ही यूरोपमधील इतर देशांकडे वळण्यासाठी १७ जुलैला लंडन कायमचें सोडलें.

पारिस येथील जगांतला सर्वांत उंच मनोरा इफेल टॉवर हा ९८४ फूट उंच आहे, तो आम्हीं पाहिला. विजेच्या पाळण्यांतून आम्ही अगदी वरच्या मजल्यावर गेलों. तेथून पारिस शहर मोठा नकाशा आडवा पसरला आहे, असें दिसतें. माणसें बाहुल्यांप्रमाणे दिसतात. मोटार-गाड्या, ट्रॅमगाड्या व बसगाड्या मुलांच्या खेळण्यांतल्यासारख्या दिसतात आणि त्या वेगाने चालत असतां जणू काय मोठाल्या घुशी रस्त्यांतून तुरतुर धावत आहेत, असें वाटतें.

पारिस येथे एका अमेरिकन कोट्याधीश बाईने अनेक राष्ट्रांतील विद्यार्थिनींच्या सोईसाठी एक प्रशस्त आंतरराष्ट्रीय वसतिगृह बांधलें आहे. तेथे शंभर विद्यार्थिनींची राहण्याची सोय आहे. शिवाय इतर विद्यार्थिनींना त्याचा फायदा घेतां येतो. त्यांना दोन प्रहरचें जेवण

( लंच ) येथें घेतां येते व वाचनालयाचा उपयोग करून घेतां येतो. वाचनालयांत शंभर विद्यार्थिनींना शांतपणें बसून अभ्यास करतां येतो. निरनिराळ्या तीस राष्ट्रांतील विद्यार्थिनी ह्या ठिकाणीं आहेत. प्रत्येक विद्यार्थिनीला स्वतंत्र खोली, तींतच पलंग, बिछाना, जवळच हाततोंड धुण्यासाठी टेबलाइतक्या उंचीवर पाणी सांडण्याची व्यवस्था व स्नानाची खोली, इतकी व्यवस्था आहे. ह्या इमारतीस आठ मजले असून वर गच्ची आहे व खाली तळघरें आहेत. इमारतींतच विद्यार्थिनींच्या उपयोगासाठीं एक प्रशस्त नाटकगृह आहे. येथे राहणाऱ्या एका हिंदी विद्यार्थिनीने हें सर्व आम्हांस दाखविलें व ह्याच नाटकगृहांत माझें व्याख्यानहि घडवून आणलें.

यूरोपांत स्त्रियांनी सिगारेट ओढणें ही गोष्ट अगदी स्वाभाविक होऊन गेली आहे. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींतील स्त्रियांचें सॉमरव्हिल् कॉलेज आम्हीं पाहिलें. तेव्हा तेथील प्रिन्सिपॉल बाईंनी आम्हांला चहाला बोलावलें; त्या वेळीं वरच्या वर्गांतील दहा बारा विद्यार्थिनींनाहि बोलावलें होतें. चहा-बिस्किटें वगैरे खाणें झाल्यावर प्रिन्सिपॉल बाईंनी सिगारेटची लहानशी पेटी उघडली व विद्यार्थिनींच्या पुढून हळू हळू जात प्रत्येकीपुढे ती केली. बहुतेकींनी एकेक सिगारेट काढून घेतली.भास्करनेहि एक घेतली. मीं मात्र कधीच सवय नसल्यामुळे घेतली नाही. हा प्रकार तेथे शिष्टाचार होऊन बसला आहे.

लिव्हर्पूलच्या पश्चिमेस आगबोटीच्या चार तासांच्या अंतरावर आइल् ऑफ मॅन् म्हणून बेट आहे. तेथील लेफ्टनंट गव्हर्नर सर क्लॉड हिल् पूर्वी पुण्यास होते त्या वेळीं त्यांनी आश्रम पाहिला होता. मी त्यांना लिहिल्याबरोबर त्यांनी आम्हांला बोलावलें. डग्लस हें त्या बेटाचें मुख्य शहर असून तेथेच गव्हर्मेंट हाऊसमध्ये त्यांनी आपले पाहुणे म्हणून आमची राहण्याची सोय केली. इंग्लंडमधील लोकांचें हवा खाण्याचें हें एक ठिकाण आहे. हें राज्यव्यवस्थेसंबंधाने सुद्धा

इंग्लंडपासून अगदी अलग आहे. इंग्लंडने नेमलेला लेफ्टनंट गव्हर्नर येवढा मात्र ब्रिटिश अधिकारी येथे असतो. बाकीचा सर्व कारभार लोकतंत्री असून सर्व कामगार स्थानिक असतात. येथील पार्लमेंट सर्वांत जनें म्हणजे आठ दहाशे वर्षांपासूनचें आहे. येथली भाषा वेगळी असून तींतच पार्लमेंटचे व इतर व्यवहार चालतात. रशेन् कॅसल् हा ह्या बेटांतला हजार वर्षांचा जुना किल्ला पहावयास आम्ही गेलों होतों. तो अजून जशाचा तसा आहे. ह्या बेटांतील सृष्टिसौंदर्य अप्रतीम आहे.

डब्लिन येथें असतांना आयरिश भाषेच्या पुनरुज्जीवनाचे चाललेले प्रयत्न पाहून आम्हांस अत्यंत आश्चर्य वाटलें व आनंदहि झाला. आयर्लंड तीनशे वर्षें ब्रिटिश अमलाखाली असल्यामुळे इंग्रजी भाषेचेंच चहूकडे प्रस्थ माजलें व घरींदारीं तीच भाषा होऊन बहुतेक आयरिश लोक आपली मातृभाषा विसरून गेले व जिकडे तिकडे इंग्रजी भाषेचें साम्राज्य झालें. देशाचें नांव आयर्लंड पण लोकांची भाषा इंग्रजी असें विकृत स्वरूप त्या चिमुकल्या राष्ट्राला आलें. आयर्लंडला स्वातंत्र्य मिळाल्या-बरोबर ही स्थिति बऱ्याच लोकांना असह्य वाटूं लागली. आयर्लंडांत परस्परविरोधी दोन राजकीय पक्ष आहेत, पण ह्या दोन्ही पक्षांचें ह्या बाबतींत एकमत आहे. पंचवीस तीस वर्षांत घरोघर आयरिश भाषेंत सर्व व्यवहार चालावे व मुलांना आयांच्या दुधाबरोबर आयरिश भाषेचें शिक्षण मिळावें अशा महत्वाकांक्षेने आयरिश भाषेच्या प्रचाराची खटपट चालली आहे. आयर्लंडांत ज्या ठिकाणीं आयरिश भाषा प्रचलित आहे असे भाग फार थोडे आहेत. विशेषतः पश्चिम भागच्या समुद्र किनाऱ्या-लगतचा भाग असा आहे. प्राथमिक शाळांसाठी जे शिक्षक तयार करा-वयाचे त्यांचीं मोठाल्या शहरांतील कॉलेजें,जेथे आयरिश भाषा बोलतात त्या भागांत न्यावीं, असा विचार चालला आहे. हेतु हा की शिक्षकांना आयरिश भाषेचा विशेष परिचय व्हावा व त्यांनी मुळापासून सर्व शिक्षण सर्व प्रांतांत आयरिश भाषेंतून द्यावें. डब्लिनमध्ये आयरिश बोलणारे लोक क्कचितच आढळतील. पण मुळापासून आयरिश भाषेंतून शिक्षण देणाऱ्या

कांहीं शाळा डब्लिनमध्ये सुरू केल्या आहेत. आम्ही अशी एक शाळा पहावयास गेलों होतों. ह्या प्रयत्नाला आयर्लंडांतले इंग्लिश लोक स्वाभाविकपणें विरोध करतातच, पण बरेच आयरिश लोकहि ह्याच्याविरुद्ध आहेत. परंतु त्यांचा हा विरोध चालणार नाही. शिक्षणखात्यांत शाळांना मदत देण्यासंबंधाने असे नियम केले आहेत की, ज्या शाळा आयरिश माध्यम ठेवून इंग्लिश दुसरी भाषा म्हणून शिकवतील त्यांना अधिक मदत द्यावयाची. ह्या प्रयत्नांना कितपत यश येईल हें भविष्यकाळ ठरवील, पण ह्या प्रयत्नांचें कौतुक केल्याशिवाय राहवत नाही.

इंग्लंड व फ्रान्स वगैरे देशांत अलीकडे असा एक प्रघात पडूं लागला आहे की, एप्रिलच्या २० तारखेच्या सुमारास दिवस मोठे होऊं लागतात तेव्हा एका ठरलेल्या तारखेला रात्रीं सर्वांनी आपली घड्याळें एक तास पुढे करावयाचीं व सर्व व्यवहार पूर्वीच्या वेळापत्रकाप्रमाणे चालवावयाचे. ह्यामुळे सूर्यप्रकाशाचा उपयोग जास्त घेतां येऊन दिव्यांचा खर्च कमी होतो. ऑक्टोबर महिन्यांत दिवस लहान होऊं लागले म्हणजे सर्वांनी एका ठरलेल्या रात्रीं घड्याळें एक तास मागे करावयाचीं व वेळांतील फरक सुधारून घ्यावयाचा.

जसजसें अधिकाधिक उत्तरेकडे जावें तसतसे उन्हाळ्यांत दिवस अधिकाधिक मोठे होत जातात व रात्री लहान होत जातात. हिवाळ्यांत ह्याच्या उलट प्रकार घडतो. आम्ही जूनच्या दुसऱ्या आठवड्याच्या आरंभीं एडिंबरो येथे गेलों, तेव्हा तेथे दिवस फार मोठे झालेले होते. तेथे २१ जूनच्या सुमारास दोन तीन दिवस असे असतात की चोवीस तासांत वाचण्यासाठी दिव्याची जरूर पडत नाही. संध्याकाळी सूर्य मावळून संधिप्रकाश नाहीसा होण्याच्या बेताला सकाळचा संधिप्रकाश सुरू होतो. संध्याकाळच्या संधिप्रकाशाचा शेवट व सकाळच्या संधिप्रकाशाचा आरंभ ह्यांची भेट झाल्यामुळे चोवीस तास उजेड असतो. ह्यापेक्षा आणखी उत्तरेकडे गेलें म्हणजे मध्यरात्रींहि

सूर्य क्षितिजाच्या वरच असतो. अर्थात् अशा ठिकाणीं आरंभींच्या बारा तासांना दिवस व पुढल्या बारा तासांना रात्र असें म्हणावयाचें. ह्या दिवसांत निजण्याकरिता रात्रीं खिडक्यांना काळे पडदे लावून मुद्दाम अंधार करावा लागतो.

इंग्लंड सोडल्यावर प्रथम बेल्जम् व नंतर हॉलंडमधील दोन तीन शहरें पाहिलीं. सुट्टीचे दिवस असल्यामुळे तेथे माहितीचें कोणी भेटलें नाही. नंतर आम्ही एकदम स्वित्झर्लंडमधील जिनीव्हा शहरीं शिक्षक-संघाच्या संमेलनासाठी गेलों.

स्वित्झर्लंडांत आल्प्स् पर्वताचें माँ ब्लां ( माऊंट ब्लँक् ) म्हणून शिखर आहे त्याच्या शेजारीं एक बर्फाची नदी ( ग्लेशिअर ) आहे ती पाहण्यास आम्ही गेलों होतों. अशा नदीचा वेग म्हणजे वर्षांतून कांही फूट असतो. आम्ही प्रथम शामोनी म्हणून पायथ्याशीं एक स्थळ आहे तेथे गेलों. चहूकडील देखावा सूर्यप्रकाशांत अतिशयच रमणीय दिसत होता. शामोनीपासून डोंगरावर जाण्यासाठी आगगाडी आहे, तिने वर गेलों व नंतर थोडेसें चालून हिमनदीवर गेलों. बर्फाच्या नदीवर वाऱ्याने वाळू पसरली गेल्यामुळे पहिल्याने तो खडक असावा असें आम्हांस वाटलें, कारण जवळच्या खडकाचा रंग व तीराजवळचा ग्लेशिअरचा रंग हे सारखेच होते. मग जेव्हा ग्लेशिअरवर जाऊन उभे राहिलों व प्रत्यक्ष बर्फ पाहिलें तेव्हा खात्री झाली. भास्कर व इतर मंडळी कठीण झालेल्या बर्फावरून दूरपर्यंत चालत गेलीं. मी पांचसहा फुटांवरच उभा राहिलों.पायाखालचें बर्फ गुळगुळित असून पाय घसरण्याची भीति फार असते;शिवाय बर्फांत मोठमोठ्या भेगा व भगदाडें असल्यामुळे वाट काढणेंहि कठीण असतें. चांगलें ऊन पडलेलें आहे, अंगांतून घाम येत आहे, ( कारण तिकडे गरम कपडे घालूनच बाहेर पडावें लागतें व चालण्याच्या व्यायामाने घाम येतो ) डोक्यावर छत्री आहे, व पायाखाली बर्फाची नदी आहे अशी स्थिति होती. कांही प्रवाशांनी नदींतलें थोडेसें बर्फ फोडलें होतें त्यांतला एक खडा मीं तोंडांत टाकला. बर्फाने आच्छादलेलें पर्वताचें शिखर सूर्यप्रकाशांत दैदीप्यमान

दिसत होतें. बर्फानें आच्छादलेला भाग पाहून परीटघडीची शुभ्र चादर जिकडे तिकडे पसरलेली आहे की काय असा भास होई.

स्वित्झर्लंडांत सात आठ दिवस राहून आम्ही डेन्मार्कमधील एल्सिनोरच्या संमेलनाला गेलों. जर्मनींतून डेन्मार्कमध्ये जातांना आम्हांला बाल्टिक समुद्रांतून जावें लागलें. त्या वेळीं एक गमतीचा प्रकार पाहावयास मिळाला. आपल्या देशांत पावसाळ्यांत नद्या भरलेल्या असल्या म्हणजे कित्येक ठिकाणीं बैलाच्या गाड्या नावेवरून एका तीरावरून दुसऱ्या तीरावर नेण्याची व्यवस्था केलेली असते. यूरोपांत कांहीं ठिकाणीं सबंध आगगाडी आगबोटीवर घेऊन लहानसा समुद्र ओलांडून पलीकडल्या तीरावर गेल्यानंतर ती पुन्हा जमिनीवर घेतां येते. आगबोटींत रूळ घातलेले असतात व ते जमिनीवरील रूळांशीं जोडले म्हणजे आगगाडी जमिनीवरून आगबोटीवर जाऊं शकते व आगबोटींतून पुन्हा जमिनीवर आणतां येते. ह्यामुळे उतारूंना सामानसुमान उतरून घेऊन पुन्हा चढविण्याचा त्रास पडत नाहीं. शिवाय गाडी बोटीवर चढली म्हणजे उतारू डब्यांतून बोटीवर उतरून समुद्राची मजा पाहतात व गाडी जमिनीवर जाण्यापूर्वी परत आपल्या डब्यांत जाऊन बसतात.

एल्सिनोरला पंधरा दिवस राहिल्यावर कोपेनहागेन येथे आलों. हें एल्सिनोरजवळच आहे. यूरोपांतले देश लहान लहान असल्यामुळे प्रवासांत एका देशांतून दुसऱ्या देशांत जाण्याचा प्रसंग वारंवार येतो. अशा प्रत्येक ठिकाणीं पासपोर्ट पाहणें, सामान तपासणें वगैरे विधि होत असतात. कित्येक ठिकाणीं तर हद्दी इतक्या जवळ आहेत कीं, ट्रामवेंत बसून फिरावयास निघालें तर एका देशांतून दुसऱ्या देशांत प्रवेश होतो. अर्थात् पासपोर्ट दाखवावा लागतो. त्याचप्रमाणें एका देशांतून दुसऱ्या देशांत गेलें म्हणजे जवळ असलेल्या नोटा व नाणीं बदलून घेऊन नव्या देशांतील प्रचलित नाणें व नोटा घेणें भाग पडतें. इंग्लंडांतल्या पौंडाच्या नोटा मात्र यूरोपांत सर्वत्र चालतात व त्या जवळ असल्या म्हणजे अडचण पडत नाहीं.

कोपेनहागेन येथे एक प्रचंड डेअरी आम्हीं पाहिली. ती सहकारी तत्त्वावर चालली आहे. सभोवतालच्या पुष्कळ मैलांवरचें दूध तेथे येतें. प्रत्येक शेतकरी आपल्या गाईचें दूध एका अगर अनेक टिनच्या मोठाल्या डब्यांत घालून ते बंद करून घराबाहेर ठेवून देतो. असे शेकडो डबे रोज दोनदा मोटारींमधून डेअरींत आणले जातात. प्रत्येक डब्यांतील दुधाचा कस व त्याचें माप घेतलें जाऊन त्यांची नोंद होते, आणि त्याप्रमाणे शेतकऱ्याला पैसे मिळतात. हें सर्व दूध शास्त्रोक्त पद्धतीने शुद्ध करण्यांत येतें. तें एकदा तापवून नंतर एकदम बर्फाच्या ऊष्णमानाइतकें गार केलें जातें व यंत्राने स्वच्छ धुतलेल्या हजारा बाटल्यांत सीलबंद करून शहरांत रतीबांकरता अगर विकण्यास पाठविलें जातें. स्वच्छतेसंबंधाने अतिशय काळजी घेतली जाते. सर्व काम यंत्राने होत असल्यामुळे हातांचा बिलकूल स्पर्श होत नाही.

कोपेनहागेनहून आम्ही स्वीडन आणि नॉर्वे देशांत गेलों. स्वीडनमधील ष्टोकहोल्म् येथे आम्हांला आठ दहा वर्षांपासून तो अठरा वीस वर्षांच्या मुलामुलींची पोहण्याची चढाओढ पहावयास सापडली. ष्टोकहोल्म् शहरांत समुद्राचें पाणी खेळवलें आहे व त्याचीं सरोवरें आणि कालवे बनवले आहेत. अशा एका सरोवराच्या प्रशस्त भागांत त्या पोहण्याच्या शर्यती झाल्या. ह्याच्या अर्ध्या भागासभोवती प्रेक्षकांसाठी जागा केली होती, व निरनिराळ्या उंचीवरून उड्या मारण्यासाठी सोई केल्या होत्या. खूप उंचीवरून नाना तऱ्हेच्या उड्या पाण्यांत टाकणें, उपडें-उताणें पोहणें, पाण्यांत बुडून बराच वेळ राहणें वगैरे प्रकार फार मनोरंजक होते. पोहण्याचे एका नमुन्याचे आटोपसर कपडे सर्वांनी घातले होते. एज्युकेशन मिनिस्टर पाण्याच्या अगदी जवळ खुर्चीवर बसले होते. एकेकाचें पोहणें संपलें म्हणजे त्याने अगर तिने पाण्यांतून बाहेर पायरीवर यावें व मिनिस्टरने हिरव्या पानांनी बनविलेला शोभिवंत मुकुट डोक्यावर घातला म्हणजे परत पाण्यांतून पोहत जाऊन ठरलेल्या वाटेने बाहेर पडून आपला दुसरा पोषाख चढवून आपल्या जागेवर बसावें, असें चाललें होतें. हजारो प्रेक्षक हे सर्व प्रकार उत्कंठेने पाहत होते. हा बक्षीससमारंभ फारच प्रेक्षणीय झाला.

नॉर्वेनंतर जर्मनींत आठ दहा दिवस घालवून आम्ही हांबूर्ग येथे आलों व यूरोप सोडलें.

# प्रकरण पंचविसावें

## अमेरिकेच्या प्रवासांतील कांही गोष्टी

माझा पहिला बेत परिषदांचीं अधिवेशनें संपल्यानंतर सप्टेंबरच्या सुमारास परत यावें असा होता. परंतु वर्गणीचें काम बरें झालें, तेव्हा ज्या जपानांतील स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीने मला महिलाविद्यापीठासाठी प्रयत्न करण्याची स्फूर्ति दिली, ती युनिव्हर्सिटी पाहावी व तिकडे जातांना अनायासें अमेरिकेंतूनहि जावें, असा विचार मनांत येऊं लागला. तथापि थंडी सुरू होण्यापूर्वी म्हणजे डिसेंबरच्या आरंभास परत यावें, असें योजलें. पण अमेरिकेंत सर्व शाळा कॉलेजांना सुट्टी असल्याने ऑक्टोबरच्या अगोदर जाऊन उपयोग नाही, असें कळलें व पुढे प्रवास पुष्कळच लांबला. पूर्वीची पांच हजारांची मंजुरी मिळाली होती; आणखी सात साडेसात हजार वर्गणीचे जमलेले पुढील प्रवासासाठी खर्च करण्याची परवानगी सेनेटकडे मागितली व ती मिळाल्याबरोबर अमेरिकेला जाणें निश्चित झालें. त्याबरोबर अमेरिकेंत व जपान, चीन वगैरे देशांत हिंडण्याचा पासपोर्ट मिळवून आम्ही हांबूर्ग येथे ता. १७ सप्टेंबर रोजीं 'रिलायन्स' आगबोटीवर चढलों. आम्ही तिसऱ्या वर्गाने जात होतों तरी त्यांत सेकंड क्लासप्रमाणेच सर्व सोयी होत्या. जागा जरा अकुंचित होती येवढेंच. 'रिलायन्स' बोटीवरील कप्तानास बर्लिनमधील आमच्या एका माहितीच्या मनुष्याने आमची विशेष सोय पाहण्याविषयी लिहिलें होतें त्यावरून त्याने आमची विचारपूस केली व दिवसांतून दोन जेवणांच्या वेळीं दहीभात मिळण्याची व्यवस्था झाली व आम्हांला थोडीं अधिक फळें मिळूं लागलीं.

उतरते वेळींहि कप्तानाच्या सांगण्यावरून आमची तपासणी लवकर होऊन आम्हांला अगोदर उतरावयास सापडलें. कोणतीही मोठी बोट न्यूयार्क बंदरांत गेल्याबरोबर वर्तमानपत्रांचे बातमीदार बोटीवर चढून कप्तानाजवळ विशेष प्रकारचे उतारू कोणी आहेत काय वगैरे चौकशी

करतात. कप्तानाने आमचीं नांवें सांगितल्यामुळे आगबोटीवरील पहिल्या वर्गांतील एका प्रशस्त खोलींत जेथे ते बसले होते तेथ आम्हांला त्यांनी बोलावलें व कांहींनी माझी मुलाखत घेतली. त्या वेळीं अमेरिकेंत दारू पिण्याला बंदी होती. ह्यामुळे ही संधि साधून त्यांनी बऱ्याचशी दारू पिऊन घेतली. एका बातमीदाराने आगबोटीवरच माझा फोटोही घेतला. आम्ही ता. २६ रोजीं न्यूयॉर्कला पोचलों.

न्यूयॉर्कच्या इंटरनॅशनल हाउसमध्ये पाहुणे म्हणून आम्ही राहिलों होतों. इंटरनॅशनल हाउस ही आंतरराष्ट्रीय संस्था रॉकफेलर नांवाच्या कोट्याधीशाच्या औदार्याने स्थापन झाली आहे. येथे सुमारें ५७ राष्ट्रांतले सहाशे विद्यार्थी राहतात. त्यांपैकी संयुक्त संस्थानांतील शेकडा पंचवीसपेक्षा अधिक असूं नयेत असा नियम आहे. हिंदुस्थानांतील वीस एकवीस विद्यार्थी येथे आहेत. सर्व राष्ट्रांतील विद्यार्थ्यांचा परस्पर परिचय व्हावा, त्यांजमध्ये प्रेमभाव नांदावा व पुढील आयुष्यांत ह्यांतल्या कांहीं ओळखी टिकून राहाव्या, हा ह्या संस्थेचा हेतु आहे. ह्या इमारतींत एक मोठें वाचनालय, व्याख्यानासाठी किंवा करमणुकीकरिता एक थिएटर, प्रशस्त भोजनगृह वगैरे सोई उत्तम आहेत. विद्यार्थ्यांना पत्रें मिळण्याची व्यवस्था मोठी सोईची केली आहे. एका खोलींत खूप मोठें लांब रुंद असें एक पोलादी कपाट असून त्यांत सहाशेपेक्षा अधिक खण केले असून ते आंतून उघडे पण बाहेरून बंद असतात. प्रत्येक विद्यार्थ्याला आपापला खण आपल्या जवळच्या किल्लीने उघडतां यावा अशी व्यवस्था आहे. ह्या खणांवर खोल्यांचेच नंबर घातलेले असल्यामुळे आपला खण ओळखण्याची पंचाइत पडत नाही. आम्हांलाहि असा एक खण मिळाला होता. पत्रें ज्याच्या त्याच्या खणांत टाकण्यासाठी ह्या पोस्टाच्या खोलींत सकाळपासून रात्रीं नऊ वाजेपर्यंत कारकुनांना हें काम करावें लागतें. प्रत्येक मजल्यावर एकेक टेलिफोन आहे. ज्याच्या-साठी टेलिफोन आला असेल त्याच्या खोलींत कर्रर असा आवाज होत राहावा अशी व्यवस्था केली आहे. असा आवाज झाला म्हणजे बटन

दाबून आवाज बंद करावयाचा व टेलिफोनशीं जावयाचें. हें टेलिफोनचें काम करण्यासाठीही एक कारकून नेहमी हजर असावा लागतो.

विद्यार्थ्यांना फार खर्च पडूं नये व सोई तर सर्व असाव्या हें धोरण ह्या संस्थेने ठेवलें आहे. खोल्यांचें भाडें माफक घेण्यांत येतें. अमेरिकेंत नोकर ठेवणें हें मोठें खर्चाचें काम आहे. म्हणून कांही मध्यम लोकांच्या हॉटेलांतून कॅफिटेरिया नांवाची पद्धत अमलांत येत आहे, ती ह्या संस्थेंत अमलांत आणली आहे. सकाळची न्याहारी (ब्रेकफस्ट) सातपासून साडेनऊपर्यंत मिळते. जसजसे विद्यार्थी येतील तसतसे त्यांनी रांगेने उभें राहावें व अनुक्रमाने एकेकाने पुढे जावें. मंडईतल्या दुकानांप्रमाणे पंधरावीस गाळ्यांत खाण्याचे तयार केलेले वेगवेगळे पदार्थ घेऊन एकेक जण बसलेला असतो. हे बहुतेक विद्यार्थी असतात व त्यांना ह्या कामाबद्दल मोबदला मिळतो. सुरुवातीच्या एका टेबलावर थाळ्या ठेवलेल्या असतात. त्यांतली एक थाळी घेऊन प्रत्येकानें गाळ्यांसमोरून जावयाचें व जातांना जरूर तेवढे पदार्थ घेत घेत शेवटच्या गाळ्याशीं गेलें म्हणजे तेथली कारकून बाई ते पदार्थ पाहून एक बिल तयार करते व तें त्या विद्यार्थ्याजवळ देते. त्याने ती थाळी व तें बिल घेऊन रिकामें टेबल सापडेल त्याच्याशीं बसून खाणें खावें व थाळी आणि बशापेले वगैरे तेथेच ठेवून बिल घेऊन परत जातांना दरवाजाशीं बसलेल्या कारकुनाजवळ बिलाचे पैसे देऊन त्याने बाहेर जावें. अशा रीतीने जेव्हाच्या तेव्हा निकाल होऊन मागाहून खाणावळीचे पैसे वसूल करण्याची दगदग पडत नाही. आम्ही तेथेच जेवीत असूं. मी एकदम आंत जाऊन बसें व भास्कर दोघांच्याही थाळ्या आणून देत असे. टेबल रिकामें झाल्याबरोबर उष्टीं भाडीं उचलून नेऊन पुन्हा टेबल साफ करण्याचें कामहि कांही विद्यार्थी करतात व त्याबद्दल ते मोबदला मिळवतात.

न्यूयॉर्क शहराचा विस्तार जमिनीच्या पृष्ठभागावरून आडवा न होतां आकाशाकडे उभा होत आहे. दहा, बारा, पंधरा, वीस मजल्यांचीं घरें तेथे पुष्कळच दिसतात. एकदा आम्ही एका गृहस्थास तेविसाव्या मजल्या-

र भेटलों. सर्वांत उंच ५२ मजल्यांची इमारत वुलवर्थ हाउस म्हणून आहे. ती पाहण्याचा योग आला नाही. आता १०० मजली इमारत तेथे झाली आहे. फार उंच इमारतींत बरेच पाळणे (लिफ्ट्स) ठेवावे लागतात. एखादा पाळणा दहा मजल्यापर्यंत न थांबतां एकदम अकराव्या मजल्यापासून प्रत्येक मजल्यावर थांबत जातो. पांचव्या मजल्यावरच्या मनुष्याला पंधराव्या मजल्यावर जावयाचें असल्यास त्याने एकपासून अकरापर्यंत प्रत्येक मजल्यावर थांबणाऱ्या पाळण्यांत बसावें व अकराव्या मजल्यावर उतरून नंतर दुसऱ्या पाळण्यांत बसावें. कांही पाळणे मेल गाड्यांप्रमाणे पांच पांच, दहा दहा मजल्यांच्या अंतराने थांबतात तर कांही प्रत्येक मजल्यावर थांबतात. मोठाल्या इमारतींत तीन चार ठिकाणीं पाळण्यांची सोय असते.

न्यूयॉर्क येथील रस्त्यांची मांडणी परकीय मनुष्याला घरें शोधून काढण्याला सोईची आहे. लांबच लांब समान्तर मोठे रस्ते, पहिला रस्ता, दुसरा रस्ता, पांचवा रस्ता असे आहेत. रस्त्याला मनुष्याचें नांव क्वचितच आढळतें. ह्या रस्त्यांना काटकोन करून समान्तर रस्ते आहेत यांना ॲव्हेन्यू म्हणतात. त्याही पहिली ॲव्हेन्यू, दहावी ॲव्हेन्यू, अशा आहेत. घरांचे नंबर रस्त्यांप्रमाणे असतात. अगोदर रस्त्याचा व नंतर घराचा असा एकदम नंबर दिलेला असतो. उदाहरणार्थ, २०५४ हें घर २० व्या रस्त्यांतील ५४ वें घर समजावें. मराठे नांवाचे गृहस्थ २४२ व्या रस्त्यांत राहत होते. त्यांचें घर आम्हांला सहज शोधून काढतां आलें.

इंग्लंडमध्ये जसें लंडन तसें स्वतंत्र संस्थानांतील पूर्वभागांत असतांना न्यूयॉर्क हें आमचें मुख्य ठिकाण झालें. तेथे पांच आठवडे राहिलों, तेवढ्या मुदतींत पांच सहा ठिकाणीं काम करून न्यूयार्क कायमचें सोडलें व फिलाडेल्फिया येथे आलों. नंतर वाटेंत एक दोन गावें घेऊन वॉशिंग्टनला गेलों.

अमेरिकेंत नीग्रो लोकांविषयीं गोऱ्या लोकांची भावना असावी तशी नाही. त्यांना तिरस्काराने वागविण्यांत येतें. उत्तरेकडील संस्थानांत नीग्रो

लोक थोडे कमी आहेत व तेथे त्यांना जरा बऱ्या तऱ्हेने वागविलें जातें; पण जसजसें दक्षिणेकडे जावें तसतशी त्यांची वस्ती अधिक आहे, व तिरस्कार जास्त दिसून येतो. नीग्रोचें रक्त थोड्या प्रमाणांत तरी ज्यांत आढळतें अशा ( कलर्ड ) निमगोऱ्या वर्णापासून तो तुळतुळीत काळ्या वर्णापर्यंतच्या सर्व लोकांसाठी वेगळ्या शाळा आहेत. वॉशिंग्टन् येथे हॉवर्ड युनिव्हर्सिटीचें नीग्रो स्त्रियांचें बोर्डिंग आहे तेथे माझें व्याख्यान झालें. नीग्रो लोकांचीं देवळेंहि वेगळीं असतात. वॉशिंग्टन्पासून आगगाडीने आठ तासांच्या अंतरावर असलेल्या ग्रीन्सबरो शहरांत आम्हांला मुद्दाम नीग्रो मुलींच्या कॉलेजांत व्याख्यान देण्यासाठी आगगाडीचें भाडें देऊन बोलावलें होतें. या शहरीं नीग्रो लोकांची वस्ती बरीच दिसली. स्टेशनवर कलर्ड लोकांचें प्रवेशद्वार व गोऱ्या लोकांचें प्रवेशद्वार अशा पाट्या होत्या. आंत कलर्ड लोकांची वेटिंग रूम वेगळी व गोऱ्यांची वेगळी. आपल्याकडील अस्पृश्यांच्या प्रश्नापेक्षाही त्यांच्याकडील कलर्ड लोकांचा प्रश्न अधिक बिकट आहे.

ग्रीन्सबरोहून परत वॉशिंग्टन्ला येऊन तेथलें काम संपवून पिट्सबर्ग येथे आलों. तेथे पिट्सबर्ग युनिव्हर्सिटी आणि कार्नेगी इन्स्टिट्यूशन् ऑफ टेक्नॉलजी ह्या दोहोंमधील विद्यार्थ्यांची रग्बी फुटबॉलची (हातांनी फेकण्याच्या चेंडूच्या खेळाची) जंगी मॅच होती. इंग्लंडांत क्रिकेटच्या खेळाला जें महत्त्व आहे. तें अमेरिकेंत ह्या खेळाला आहे. जिनीव्हा येथे एका बाईची व तिच्या वडिलांची गाठ पडली होती, त्या गृहस्थांकडे आम्ही लंचसाठी गेलों होतों. त्याच वेळीं ही रग्बीची मॅच चालू होती. आम्ही अमेरिकेंत असली मॅच पाहिली नाहीं, हें कळल्याबरोबर त्यांनी आपल्या खर्चानें आपल्या मुलीबरोबर आम्हांला मॅच पाहण्यासाठी आग्रहाने दवडलें. त्या शहरांत त्या दिवशीं संभाषणाचा दुसरा विषय नव्हता. खेळाचें विस्तीर्ण मैदान दीर्घवर्तुळाकृति होतें. मध्यें खोलांत सपाट मैदानावर खेळ चालला होता. सभोवार प्रेक्षकांसाठी चढत्या पायऱ्यांवर बाकें अगर

खुर्च्या होत्या. टिकिटाशिवाय कोणाला प्रवेश नव्हता. त्या क्रीडांगणांत पाऊण लाख प्रेक्षकांची सोय असून केवळ आंत जाण्यासाठी २०–२५ प्रवेशद्वारें होतीं. त्या वेळीं सुमारें साठ हजार लोक असावे. खेळाडूंमध्ये विलक्षण उत्साह दिसत होता व त्या त्या बाजूचे पक्षपाती आपापल्या खेळाडूंना उत्तेजन देण्यासाठी खूप ओरडत व हातरुमाल फलकारीत.

पिट्स्बर्गला आठ दिवस राहून आम्ही डिट्रॉइटला गेलों. ह्या शहरांत मोटारींचे मोठे कारखाने असून सुमारें अडीचशे हिंदी कामगार तेथे आहेत. तेथून जवळच ॲन् आर्बर युनिव्हर्सिटी आहे. तींत बार्बर स्कॉलर्शिप मिळणाऱ्या स्त्रिया शिकत असतात. आम्ही गेलों तेव्हा पांच हिंदी स्त्रिया व बरेच हिंदी विद्यार्थी होते. डिट्रॉइटहून शिकागोला गेलों. हे युनायटेड् स्टेट्स्मधील महत्त्वाच्या मानाने न्यूयॉर्कच्या खालोखाल आहे. तेथेहि हिंदी विद्यार्थी बरेच आहेत. तेथे पांच सहा दिवस राहून वाटेंत पांच सहा ठिकाणीं थांबत लॉस एंजल्सला आलों.

लॉस एंजल्स्पासून पस्तीस मैलांवर क्लेअर मॉंट म्हणून ठिकाण आहे तेथून पंधरा मैलांवर एकान्त स्थळीं कॅलिफोर्निया जूनियर रिपब्लिक नांवाची संस्था उनाड मुलांसाठी मिसेस् फाउलर ह्या बाईनी चालवली आहे. ह्या बाईनी आम्हांला तेथे नेऊन एक रात्र आपल्या घरीं पाहुणचार करून दुसऱ्या दिवशीं आम्हांला सर्व दाखवून परत लॉस एंजल्सला पोंचविण्याची व्यवस्था केली. ह्या शाळेंत कांही आईबाप आपलीं उनाड मुलें आपण होऊन खर्च देऊन पाठवतात व कांही जुव्हेनाइल कोर्टाच्या मार्फत येतात. बारापासून अठरा वर्षांच्या वयापर्यंतचे १२० मुलगे येथे आहेत. त्यांना दोनतीन तास शाळेंतलें शिक्षण मिळतें व बाकीचा वेळ निरनिराळ्या धंद्यांचें प्रत्यक्ष शिक्षण मिळतें. शेतकी, सुतारी, लोहारी वगैरे काम शिकविण्याची व्यवस्था आहे. ह्या संस्थेच्या नांवाप्रमाणे ह्या लहानशा वसाहतींत मुलांचें स्वराज्य आहे. उत्तम प्रकारची शिस्त राखली जाऊन मुलगे पुढील आयुष्य सुखाने घालविण्यास तयार होतात.

ब्रिटिश बेटांत व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत बऱ्याच हिंदी लोकांनी तिकडील स्त्रियांशीं विवाह केले आहेत व ते तिकडेच रहातात. इंग्लडांतील अशा दोन व अमेरिकेंत सहासात दक्षिणी कुटुंबांचा थोडा फार सहवास आम्हांला घडला. ही बहुतेक ब्राह्मण मंडळी आहे. ही कुटुंबें सुखाने नांदत असल्याचें आमच्या दृष्टोत्पत्तीस आलें. ह्या सगळयांकडे आम्ही चहाला किंवा भोजनाला गेलों व बरेच तास त्यांजकडे घालविले आणि कित्येकांकडे कांही दिवस राहिलों. आम्हांला हीं जोडपीं प्रेमळ वाटलीं. त्यांतल्या बायकांना साहजिकच हिंदुस्थानाविषयी सहानुभूति वाटते व त्यांच्या परिचयाच्या मंडळींतहि हिंदुस्थानाविषयी जिज्ञासा उत्पन्न होते.

यूरोपांतल्या व अमेरिकेंतल्या लोकांमध्ये शिस्त अंगांत मुरलेली आहे. कोणी रस्त्यांत थुंकावयाचा नाही, नाक शिंकरणार नाही किंवा केर कचरा टाकावयाचा नाही. प्रत्येकाजवळ हातरुमाल असतो व विशेष प्रसंगीं नाक शिंकरणें, थुंकणें त्यांतच करून घरीं गेल्यावर तो बदलतात. रेल्वेच्या तिकिट ऑफिसजवळ किंवा नाटक सिनेमागृहांत गर्दी झाली तर मागून येणारे धाटिंगण कोपरखळया मारीत पुढे जाण्याची धडपड करावयाचे नाहीत ते जसजसे येतील तसतसे रांग करून उभे राहतील. अशा शेकडो लोकांच्या रांगा लागलेल्या असतात. गाडी चुकत असली किंवा खेळ सुरू झालेला असला तरी आपली पाळी येईल तेव्हाच मनुष्य तिकीट घेईल.

इंग्लंडांत श्रीमंतांचे मुलगे वडिलांच्या संपत्तीच्या बळावर बहुधा आढ्यतेने वागणारे आढळावयाचे. अमेरिकेंतील कोट्याधीशांचे मुलगे पुष्कळ वेळां आपल्या पायांवर उभे राहण्याचा प्रयत्न करून टक्के टोणपे खाऊन जगाचा अनुभव मिळवतात आणि ज्ञान संपादन करतात. कित्येक वेळां रस्त्यांत हिंडून वर्तमानपत्रें विकणारा, विद्यार्थ्यांच्या वसतिगृहांत वाढण्याचें किंवा भांडीं विसळण्याचें काम करणारा अथवा फळांचा हंगाम आला असतां फळझाडांवरून फळें वेचून काढणारा मुलगा एखाद्या कोट्याधीशाचाही असूं शकेल. असें करण्यांत त्या मुलाला कोणत्याही प्रकारचा कमीपणा वाटत नाही व त्याचीं आईबापेंही अशा कामीं

मुलाला उत्तेजनच देतात. आमच्या देशांतील श्रीमंतांच्या मुलांनी अनुकरण करण्यासारखी ही गोष्ट आहे.

स्त्रियांनी सार्वजनिक कामांत पडणें ही गोष्ट यूरोपांत आणि अमेरिकेंत अगदी स्वाभाविक होऊन गेलेली आहे. अमेरिकेंत फुरसतीचा वेळ असणाऱ्या सुखी स्त्रिया पुष्कळ आहेत. त्यांपैकी बऱ्याच आपला वेळ सार्वजनिक कामांत घालवतात. ह्याशिवाय कांही ध्येयाने प्रेरित झालेल्या स्त्रिया लग्न न करतां आपल्या कार्याच्या मागे लागतात. इंटर-नॅशनल असोसिएशन फॉर पीस अँड फ्रीडम ( शांतता आणि स्वातंत्र्य ) ह्यांसाठी काम करणारी आंतरराष्ट्रीय संस्था ही बहुतेक स्त्रियांनीच चालविली आहे व तिच्या शाखा चहूकडे आहेत.

लॉस एंजल्स्‌च्या भोवतालच्या दोन चार ठिकाणीं जाऊन आम्ही सॅन् फ्रान्सिस्कोला आलों. तेथे जवळच असणारें मुलींचें मिल्स कॉलेज व जवळपासचीं शीख लोकांच्या वस्तीचीं लहान लहान ठिकाणें पाहून ता. २४ डिसेंबर १९२९ रोजीं जपानला जाण्यासाठी सिॲट्ल् येथे ‘ मैबीरिया मारू ’ नांवाच्या जपानी बोटींत बसलों.

# प्रकरण सव्विसावें

## आशियाच्या प्रवासांतील कांही गोष्टी

ता. ७ जानेवारी १९३० रोजीं आम्ही जपानांत योकोहामा बंदरांत उतरलों. आगबोटीच्या प्रवासांत असतांना घड्याळांत रोज थोडा थोडा फरक करावा लागतो. पश्चिमेकडे जातांना जितकें अंतर तुटलें असेल त्या मानाने घड्याळ मागे सारावें लागतें. ह्याच्या उलट पूर्वेला जात असल्यास पुढे करावें लागतें. मुंबईहून आगबोटींत बसून निघाल्यानंतर बहुतकरून दररोज घड्याळ कधी वीस मिनिटें, कधी तीस मिनिटें असें मागे करावें लागे. अमेरिकेचा पूर्व किनारा आणि पश्चिम किनारा ह्यांत सुमारें तीन तासांचें अंतर पडतें. अमेरिकेंतून जपानाकडे जातांनाही दररोज घड्याळ अर्धा तास मागे करावें लागे. ता. ३० डिसेंबर सोमवार रोजीं आम्ही १८०° रेखांशावर आलों. येथून आगबोटी जाऊं लागल्या म्हणजे जपानाकडे जाणाऱ्या बोटी एक दिवस गाळून टाकतात व अमेरिकेकडे जाणाऱ्या बोटी एक दिवस फालतु धरतात. आम्ही ३० डिसेंबर सोमवार संपल्यावर दुसरा दिवस लगेच १ जानेवारी बुधवार धरला.

जपानमध्ये जातांना मला विशेष आनंद झाला, कारण तेथील स्त्रियांची युनिव्हर्सिटी मला पाहावयास मिळणार होती. जपानी स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीचे उत्पादक नरूसे ह्यांच्या बरोबरीने काम करणारे आसो हे अजून तेथे काम करीत आहेत त्यांनी आम्हांस सर्व दाखविलें. नरूसे हे युनिव्हर्सिटीचे प्रेसिडेंट होते. आता आसो हे प्रेसिडेंट आहेत. युनिव्हर्सिटी टोकिओ येथे आहे. आम्ही योकोहामा येथे उतरलों होतों. कारण योकोहामा हें बंदर असून व्यापाराचें ठिकाण आहे व तेथे सिंधी व्यापारी बरेच आहेत. त्यांपैकी एकाकडे आमची राहण्याची सोय चांगली झाली होती. तेथून आगगाडीने पाऊण तासांत टोकिओला जातां येतें. त्यामुळे आम्ही बहुतेक रोज जात असूं. १९२३ सालीं झालेल्या

भूकंपाने योकोहामा व टोकिओ ह्या दोन्ही शहरांचा फार नाश झाला. स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीच्या इमारती जमीनदोस्त झाल्या होत्या; परंतु न डगमगतां चालचलाऊ झोपड्या बांधून त्यांनी काम सुरू केलें व हळू हळू नव्या इमारतीही तयार करीत आहेत. आतापर्यंत ४२०० स्त्रिया ह्या युनिव्हर्सिटींतून पदवीधर होऊन बाहेर पडल्या आहेत. हल्ली कॉलेज विभागांत १२०० स्त्रिया आहेत आणि ४०० युनिव्हर्सिटीच्या खालच्या (Preparatory) विभागांत आहेत. शिवाय हायस्कुलांत सहाशे आहेत. ही युनिव्हर्सिटी केवळ खासगी प्रयत्नांनी चालली आहे. अजूनही तिचा सरकारशीं संबंध नाही. हींतून बाहेर पडलेल्या पदवीधर स्त्रियांची पैशांची मदत ह्या युनिव्हर्सिटीला फार आहे.

योकोहामाहून आम्ही आगगाडीने कोबे येथे गेलों. येथे सिंधी व्यापारी असून इतरही हिंदी व्यापारी आहेत. कोबे येथे आम्ही फतेअल्ली नांवाचे एक व्यापारी व त्यांची पत्नी यांचे पाहुणे होतों. त्यांची पत्नी चांगली इंग्रजी शिकलेली असून तीं उभयता घरच्या माणसांप्रमाणे आमच्याशीं वागलीं. दुर्दैवाने आम्ही त्यांच्या घरीं असतां चोरी झाली. आम्हांला एका शेजारी एक अशा वेगळ्या खोल्या दिल्या होत्या. भास्कर आपल्या खोलीच्या दरवाजाचा बोल्ट लावण्यास विसरला. त्याच्या खोलींतून चोर माझ्या खोलींत आले. माझें घड्याळ, भास्करचें घड्याळ, ओव्हर-कोट व एक सूट, बुटांचा एक जोड, मला भेट म्हणून दिलेलें सोन्याचें व भास्करचें साधें फांउटन पेन, पैशांसह खिशांतलीं पाकिटें, अनेक देशांतलीं नाणीं जमा करून एका पिशवींत ठेवलीं होतीं ती पिशवी, इतकें आमचें सामान गेलें व घरवाल्यांचें एक घड्याळ, तीन ओव्हर-कोट व आणखी कांही कपडे इतकें सामान गेलें. भास्करच्या खोलींतल्या दोन ट्रंका त्यांनी रिकाम्या केल्या व चोरलेलें सामान त्या ट्रंकांत भरून ते पळून गेले. आम्हांपैकी कोणाला दाद लागली नाही. उजाडल्या-वर हा प्रकार उघडकीस आला. फतेअल्ली व त्यांची पत्नी ह्यांना आपलें सामान गेल्याबद्दल वाईट वाटलें नाही, पण आमचें सामान जाऊन

गरसोय झाली ह्याबद्दल फार वाईट वाटलें. त्यांनी आम्हांला घड्याळें दिलीं, फाउंटन पेनें दिलीं व ओव्हरकोट त्यांचा मुंबईस पोचवायाचा होता तो भास्करच्या उपयोगी पडला. त्यांतल्या त्यांत सुदैवाची गोष्ट येवढीच झाली की, त्याच रात्रीं निजण्यापूर्वी वर्गणीची जमलेली रक्कम फत्तेअल्लींच्या स्वाधीन केली होती. पुढे बरेच दिवसांनी चोरीस गेलेल्या मालापैकी कांही माल सांपडला, तो फत्तेअल्लींनी आमच्याकडे पाठविला.

भगवान बुद्धदेवाची आई मायादेवी हिचें देऊळ कोबे येथे एका फार उंच टेकडीवर आहे, तें पाहण्यास आम्ही गेलों होतों. डोंगराच्या पायथ्यापासून वर जाण्यास पोलादी तारांच्या दोरखंडांच्या साह्याने वर जाणारी ट्रॅम गाडी आहे. तींतून गेल्यानंतर कांही चढणीचे रस्ते व नंतर चारशे पायऱ्या चढून वर जावें लागतें.

ता. २६ जानेवारीला आम्ही कोबेहून 'शांघाय मारू' नांवाच्या बोटीने ता. २८ रोजीं शांघाय येथे गेलों. येथे बऱ्याच युरोपियन राष्ट्रांचे संबंध असून त्या प्रत्येक राष्ट्राच्या अंमलाखाली शहराचा थोडा भाग आहे. येथून ता. ४ फेब्रुवारी रोजीं 'हकुसान मारू' आगबोटीने निघून ता. ७ रोजीं हाँगकाँग येथे पोचलों. हाँगकाँग हें टुमदार बेट केवळ इंग्रजांच्या मालकीचें आहे. ता. १५ फेब्रुवारी रोजीं आम्ही चीन सोडून हाँगकाँग बंदरांतून निघालों ते 'प्रेसिडेंट क्लीव्हलँड' नांवाच्या अमेरिकन बोटीने फिलिपाइन बेटाचें मुख्य शहर मॅनिला येथे ता. १७ रोजीं उतरलों. फिलिपाइन बेटें पूर्वी स्पेन देशाच्या ताब्यांत होतीं. आता तीं अमेरिकेंतील स्वतंत्र संस्थानांच्या ताब्यांत आहेत.

फिलिपाइन बेटांतील वस्ती जपानी, चिनी, स्पॅनिश आणि अमेरिकन ह्यांच्या मिश्रणाने झाली आहे. हिंदी लोक पूर्वी तिकडे गेलेले असावे पण आता ते तेथे असल्याचें चिन्ह दिसत नाही. तेही तेथील वस्तींतच मिसळून गेलेले असावे. हिंदी लोकांचा सांस्कृतिक पगडा पुष्कळ वर्षें ह्या बेटांत असावा असें मानण्याला एक कारण आहे. अपभ्रष्ट संस्कृत शब्द तेथील

भाषेंत बरेच आढळतात. ह्या संबंधाने मॅनिला येथील युनिव्हर्सिटींतील बंगाली प्रोफेसर रॉय हे संशोधन करीत आहेत व त्यासंबंधाने ते एक पुस्तकहि लिहिणार आहेत. मुसलमान लोक बरेच आहेत त्यांनी आपलें वैशिष्ट्य कायम राखलें आहे. मॅनिला येथील मध्यम व वरच्या वर्गांतील लोकांची राहणी पाश्चात्य धर्तीची झाली आहे. तेथे आम्हांस एक विशेष आढळून आला तो हा की, केवळ फीच्या उत्पन्नावर सरकारी मदती-शिवाय तेथील खासगी मुलांचीं व मुलींचीं हायस्कुलें आणि कॉलेजें चालूं शकतात. ह्यावरून लोक सुखी असावे, असें दिसतें. मुंबईत पारशांचीं अशीं मुलांमुलींचीं हायस्कुलें आहेत. आम्ही तारीख २२ फेब्रुवारी रोजीं मॅनिलाहून ' टिकारांग ' बोटीने जावा बेटांतील सुरबाया बंदराला जाण्यासाठी निघालों ते वाटेंत सेलेबीज बेटांची राजधानी मकासर येथे तारीख २७ रोजीं सकाळीं आलों. तेथे बोट पांच तास थांबणार होती म्हणून आम्ही शहरांत जाऊन एका सिंधी व्यापाऱ्याची गांठ घेतली व तेवढ्या वेळांत वर्गणीचें थोडें काम करून व हिंदी पद्धतीचें भोजन करून आगबोटीवर आलो ते तारीख १ मार्च रोजीं सुरबाया येथे पोंचलों. येथील काम आटपून तारीख ५ रोजीं आगगाडीने बटेव्हिया येथे जाण्यासाठी निघालों.

जावा बेटांत सुरबाया आणि बटेव्हिया हीं दोन मोठीं बंदरें दोन टोकांना आहेत. त्यांना जोडणाऱ्या रेल्वेरस्त्यावर जोक्जा म्हणून स्टेशन आहे. तेथून चाळीस मैलांवर एक भव्य स्तूप आहे. तो लहानशा टेकडीसारखा वाटतो. ह्या सर्व ठिकाणीं आम्ही गेलों होतों. हा स्तूप पाहण्यासाठी जगांतील शोधक प्रवासी जात असतात. हा भरीव असून त्याचे सात मजले आहेत. तो वरवर निमुळता होत गेलेला आहे. वर जाण्याला जिने आहेत. प्रत्येक मजल्याभोवती ग्यालरी आहे. बाजूच्या भिंती दगडाच्या असून त्यांवर बुद्धाच्या व इतरहीं मूर्ति कोरलेल्या आहेत. अखेरपर्यंत एकंदर उंच उंच शंभर पायऱ्या आहेत. जावा बेटांत हिंदु लोकांची मोठीच वसाहत झालेली होती असें दिसतें.

जोक्जालों येतांना वाटेंत एका स्टेशनवर गाडी उभी होती तेथे जवळच गणपतीची मोठी दगडी मूर्ति, शंकराची पिंडी, नंदी वगैरे पडलेलीं दिसत होतीं. आम्हाला भंगलेल्या मूर्तिहि पुष्कळ दिसल्या. बटेव्हिया येथील प्राचीन वस्तुसंग्रहालयांत गेलों तेथे बुद्धाच्या मोठाल्या ध्यानस्थ मूर्ति त्याचप्रमाणे गणपति, दत्तात्रय, अष्टभुजा, भवानी वगैरे मूर्तिहि होत्या.

जावा बेट हल्ली डच लोकांच्या ताब्यांत आहे. पूर्वीच्या काळांत स्थायिक झालेले हिंदी लोक ह्या बेटांत पुष्कळ असले पाहिजेत. हे तेथे जुन्या देवळांचे जे अवशेष बऱ्याच ठिकाणीं आढळतात त्यांवरून सिद्ध होतें. पण ते आता आपलें हिंदीपण विसरून गेले आहेत. त्यांचें हिंदी-पण ओळखतां यावें अशी एक गोष्ट शिल्लक आहे. उत्सवप्रसंगी रामा-यणांतल्या रामरावणांच्या भूमिका घेऊन राक्षसांचे मुखवटे घालून खेळ करण्याची तिकडे अजून कांही ठिकाणी वहिवाट आहे. येथेही मुसलमान लोकांनी आपलेपणा राखला आहे. सुरबायाहून एक रात्र आगबोटींत घालवून बलि म्हणून बेट आहे तेथे जातां येतें. पण आम्हांला तेथे जाण्यास सवड झाली नाही. हिंदी आचारविचार कायम असलेले लोक तेथे आढळतात, असें सांगतात. आम्ही जावा बेटांत, सुरबाया व जोक्जा आणि बटेव्हिया ह्या तीन ठिकाणीं गेलों. तेथील लोक सुखी दिसले. शिक्षणाचा प्रसारही बरा होत आहे.

जावा बेट सोडून मलाया द्वीपकल्पांत जाण्यासाठी तारीख १० रोजीं बटेव्हिया येथे 'तासमन्' बोटींत बसलों ते १२ मार्चला सिंगापूरला उतरलों. मलायांत हिंदी लोकांचा भरणा फार मोठा आहे. पूर्वीच्या काळीं गेलेले हिंदु तेथील लोकांतच मिसळले असतील, पण अलीकडल्या काळांत ब्रिटिश सरकारचे निरनिराळ्या खात्यांतले लहान मोठे नौकर, लहान मोठे व्यापारी, टिनच्या खाणींत व रबराच्या जंगलांत काम करणारे मद्रासी मजूर, त्यांच्या गरजा भागवणारे चेट्टी सावकार व धार्मिक विधींत मदत करणारा ब्राह्मणवर्ग, डाक्टर आणि वकील मिळून मोठा हिंदुसमाज मोठ्या शहरांत आढळून येतो. मलायांत फिरतांना आपण हिंदुस्थानाच्या बाहेर

आहों असें वाटतच नाही. मलायांत चिनी लोक पुष्कळ आहेत व त्यांतले कित्येक धनाढ्य बनून तेथे स्थायिक झालेले आहेत. चिनी लोकांत स्वदेश-प्रीति विशेष आहे व विशेष प्रसंगी चीन देशाला ते पुष्कळ मदत पाठवतात.

मलायामध्ये व विशेषतः त्या प्रान्तांतील ईपो व टायपिंग ह्या दोन शहरांत घरें बांधण्याची पद्धत अगदी वेगळी दिसून आली. पाया व जोतें वगैरेच्या भानगडींत न पडतां दीड, दोन अगर तीन फूट उंचीचे खांब लाकडी अगर कॉंक्रीटचे देऊन त्यांचावर हलकी लाकडी इमारत उठवा-वयाची; अर्थात् ही एकमजलीच. अशा घरांत जमिनीला ओल येण्याची भीति नाही. खालचा भाग अडगळ ठेवण्याच्याहि उपयोगी पडतो.

मलायांतील दोन तीन ठिकाणीं आगगाडीने जाऊन शेवटी पेनांग बंदरांत आलों. तारीख ५ एप्रिल रोजीं मलायांतील काम संपवून हिंदु-स्थानास येण्यासाठी 'रोना' बोटीवर बसलों ते तारीख १२ रोजीं मद्रास येथे उतरलों व तारीख १४ एप्रिल १९३० रोजीं पुणें गाठलें. अशा रीतीने पृथ्वी प्रदक्षिणा पुरी करून तेरा महिन्यांनी स्वदेशीं परत आलों.

# प्रकरण सत्ताविसावें

## आफ्रिकेच्या प्रवासांतील कांही गोष्टी

पृथ्वीप्रदक्षिणा पुरी करून परत आल्यानंतर परदेशच्या प्रवासाची अगर पुष्कळ दिवस आगबोटींत काढण्यासंबंधाची भीति नाहीशी झाली. आफ्रिकेंत हिंदी व्यापारी असून कांही हिंदी संस्थांच्या माणसांनी तिकडून पैसा आणल्याचें मीं ऐकलें होतें. शिवाय माझा मुलगा शंकर मोंबासांत डॉक्टर असून तो तिकडील पुढाऱ्यांत मोडतो, त्याला मीं पत्र लिहून विचारलें. त्याचें उत्तर ‘ व्यापाराला मंदी आलेली आहे, पण खेप अगदींच फुकट जाणार नाही ’ असें आलें. तेव्हा तिकडे जाण्याचा बेत मीं कायम केला व पृथ्वीप्रदक्षिणा करून परत आल्यावर सात आठ महिन्यांनी आफ्रिकेला जाण्यासाठी ता. ३१ डिसेंबर १९३० रोजीं मुंबई येथे ‘ खंडाळा ’ बोटीवर चढलों तो ता. १० जानेवारी १९३१ रोजीं मोंबासा बंदरांत उतरलों. तिकडे हिंदी मनुष्यें सर्व ठिकाणीं पुष्कळ आहेत, तेव्हा सोबतीची जरूरी नव्हती. आनंदी-बाईची व शंकरच्या मंडळीची भेटहि बरेच दिवसांत झालेली नव्हती. तेव्हा तीहि मजबरोबर यावयास निघाली. अर्थात् तिचा खर्च तिने सोसला. आश्रमासाठी कांही वर्गणी मिळाली तर मिळवावी असाहि तिचा विचार होता. त्याप्रमाणे तिनेही दोन हजार रुपये मिळवले व मज-बरोबरच ती परत आली.

मोंबासा हें केनिया कॉलनीचें मुख्य बंदर आहे. प्रथम फक्त मोंबासा येथे काम करून पहिल्याने इतर प्रान्तांतलें काम संपवावें व सरते शेवटीं केनियांतील इतर शहरीं काम करावें, असें ठरविलें. त्याप्रमाणे ता. १ मार्चला मोंबासाहून निघालों तो ता. ३ रोजीं कमली म्हणून युगांडा प्रांतांत शहर आहे तेथे गेलों. तेथून जिंजा, कंपाला, एन्टेब्बी, मबाले वगैरे युगांडा प्रातांतील लहान मोठ्या पंधरा वीस शहरांत काम करून

१५ मे रोजीं मोंबासाला परत आलों. आफ्रिकेंतील प्रवासांत मोंबासा हें माझें मुख्य ठिकाण होतें. माझा मुलगा शंकर हा तेथे असल्यामुळे मला तें फार सोईचें झालें. युगांडांतील सर्व प्रवास आगगाडीने व मोटारीने झाला. नंतर ता. १३ जून रोजीं टँगॅनिका प्रान्तांत काम करण्यासाठी ‘कारागोला’ बोटीने निघालों तो ता. १५ रोजीं दारेसलामला पोचलों. हें टँगॅनिका प्रान्ताचें मुख्य बंदर आणि मुख्य शहर आहे. केनिया व युगांडा हे प्रान्त ब्रिटिश अमलाखाली फार वर्षें आहेत, परंतु टँगॅनिका प्रान्त जर्मन लोकांच्या हातांत होता, तो महायुद्धानंतर ब्रिटिशांकडे आला. तेथे काम करून ता. ५ जुलै रोजीं ‘डुमरा’ बोटीने टँगॅनिका प्रान्तांतील लिंडी बंदरास जावयास निघालों तो ता. ८ रोजीं तेथे पोचलों तेथील काम संपवून मोटारीने मिकिंदानी येथे जाऊन थोड्या तासांत तेथील काम उरकून लिंडीला परत आलों व त्याच ‘डुमरा’ बोटीने १४ तारखेला दारेसलाम येथे आलों. नंतर लवकरच आगगाडीने मोरोगोरो, किलोसा, डोडोमा, टबोरा, किगोमा, म्वांझा, बुकोबा व आणखी सात आठ लहान लहान ठिकाणीं जाऊन दारेसलामला परत आलों. म्वांझा आणि बुकोबा येथील जातां येतांचा प्रवास आगबोटीने झाला व बाकीचा सर्व आगगाडीने व मोटारीने झाला. ह्या सर्व प्रवासाला दोन महिने लागले. १२ सप्टेंबर रोजीं ‘खलीफा’ बोटीने दारेसलामहून निघालों तो सहा तासांनी झांझिबार येथे पोचलों. येथे नावाला सुलतान आहे पण कारभार सगळा इंग्लिश लोकांच्याच हातीं आहे. येथे तीन आठवडे काम करून ता. ३० सप्टेंबर रोजीं ‘लँडोव्हर’ बोटीने निघालों तो सहा तासांनी टँगॅनिका प्रान्तांतील टांगा बंदरीं उतरलों. दारेसलाम बंदराला अलीकडेच महत्व आलें आहे. त्यापूर्वी टँगॅनिका प्रान्तांतला बहुतेक व्यापार टांगा बंदरांतूनच होत होता. तेथून टँगॅनिका प्रान्तांतलीं मोशी व अरुषा हीं दोन शहरें घेऊन ता. १९ ऑक्टोबर रोजीं मोंबासाला परत आलों. हा सर्व प्रवास आगगाडीनेच झाला.

दक्षिण आफ्रिकेंत जाण्यासाठी मोंबासाहून ता. ३१ ऑक्टोबर रोजीं खंडाळा बोटीने निघालों. ता. ८ नव्हेंबर रोजीं डेलागोआ बेमधील पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेच्या लोरेन्सो मार्किस ह्या बंदरांत आलों. ह्या बंदरांत बोट दीड दिवस राहावयाची होती. ता. ९ रोजीं दिवाळी होती. त्या दिवशीं तेथील मंडळींनी मला गांवांत नेलें व भोजनोत्तर व्याख्यानाची व्यवस्था होऊन बाराशे रुपये वर्गणीची यादी झाली. ही वर्गणी मागाहून हातीं आली. झांझिबारच्या एका गृहस्थाने मीं ह्या बोटीने येत आहे असें तेथील आपल्या मित्राला कळविलें होतें. सर्व आटोपल्यावर मी परत आगबोटीवर आलों व ता. ११ रोजीं दोन प्रहरीं डर्बान बंदरांत उतरलों. दक्षिण आफ्रिकेंतले बरेच प्रान्त ब्रिटिश लोकांच्या ताब्यांत आहेत. नाताळ, ट्रान्सवाल आणि केप प्रॉव्हिन्स ह्यांचें मिळून यूनियन सरकार बनलें आहे. साम्राज्यांतील इतर वसाहतीं-प्रमाणे येथील कारभार स्वतंत्र आहे. त्याचा ब्रिटिश सरकारशीं संबंध नाहीं. डर्बान येथील काम आटोपल्यावर नाताळमधील पीटरमॉरिट्झ्-बर्ग व लेडी स्मिथ येथील काम उरकून ट्रान्सवालमधील जोहान्सबर्ग येथे गेलों. दक्षिण आफ्रिकेंतील हेंच सर्वांत मोठें शहर आहे. प्रिटोरिया हें तेथून जवळच असून यूनियन सरकारचें राजधानीचें शहर आहे. ह्या दोन्ही ठिकाणचें काम झाल्यावर किंबर्ले व डी आर हीं शहरें घेऊन केपटाउनमध्ये गेलों. मी तेथे असतांच श्रीनिवास शास्त्री व सरोजिनी नायडू ही मंडळी आली. त्यांच्या स्वागतासाठी मी मि. सी. एफ्. अँड्र्यूज ह्यांच्या बरोबर आगबोटीवर गेलों होतों. केपटाउननंतर केप प्रॉव्हिन्स मधलीं यूटन हेग, पोर्ट एलिझाबेथ आणि ईस्ट लंडन हीं शहरें घेऊन परत डर्बानला आलों. तेथून जोहान्सबर्ग येथे राहिलेलें काम पुरें करण्यासाठी गेलों व तें आटोपल्यावर प्रिटोरिया मार्गाने लोरेन्सो मार्किस येथे येऊन मोंबासाला परत जाण्यासाठी ता. २६ जानेवारी १९३२ रोजीं ‘केनिया’ बोटींत बसलों. दक्षिण आफ्रिकेंतील सर्व प्रवास आगगाडीने झाला. अशा रीतीने तीन महिन्यांत दक्षिण आफ्रिकेंतील प्रवास संपवून ता. ४ फेब्रुवारी रोजीं मोंबासाला उतरलों.

दोन तीन दिवस तेथे राहून केनियांतलीं महत्वाचीं शहरें घेण्यासाठीं प्रथम राजधानीचें शहर नैरोबी येथे गेलों. व्यापाराची मंदी भयंकर झाली होती. नौकऱ्यांतून निघालेले लोक सहकुटुंब हिंदुस्थानांत परत जाऊं लागले होते. व्यापारी बायकामुलांना हिंदुस्थानांत पाठवून आपण एकटेच तेथे रहाण्याच्या विचारांत होते. अशा स्थितींत व्याख्यानें वगैरे बरींच झालीं परंतु नैरोबींत वर्गणीचें काम फार असमाधानकारक झालें. तेव्हा बाकीचीं शहरें घेण्याचा विचार सोडून मोंबासाला परत आलों व ता. ४ मार्च रोजीं आफ्रिकेला रामराम ठोकून 'कारंजा' बोटीने निघालों तो ता. १२ मार्च १९३२ रोजीं मुंबईस उतरलों व त्याच दिवशीं संध्याकाळीं पुण्यास आलों. अशा रीतीने ह्या वेळीं साडेचौदा महिने हिंदुस्थानाबाहेर घालविले.

पूर्व आफ्रिकेंत पूर्वी अरब लोकांचा अंमल होता. अरब लोक पूर्वी आफ्रिकेशीं व्यापार करीत. नीग्रो लोकांना धरून गलबतांत घालून नेऊन गुलाम म्हणून विकण्याचाही व्यापार ते करीत असत. त्या वेळी झांझिबार हें अरब लोकांचें मुख्य ठिकाण होतें. व व्यापाराचेंही तेंच मोठें बंदर होतें. झांझिबारचें राज्य अजून सुलतानच्या नांवानेच चालतें. तेथे सुलतानला उत्पन्न मोठें असून त्याचा मानमरातबहि ठेवला जातो. कांही अरब सरदार कुटुंबें झांझिबारमध्ये आहेत त्यांनाहि इंग्रज सरकारकडून कांही इनाम किंवा जहागिरी आहे. इंग्रजांनी अरबांकडून केनिया व युगांडा हे प्रान्त घेतले आणि जर्मनांनी टँगॅनिका प्रान्त घेतला. इंग्रजांनी मोंबासा बंदर नांवारूपाला आणलें तेव्हा झांझिबारचें वैभव कमी होऊन मोंबासाला महत्व आलें.अजून मोंबासाला झांझिबारच्या सुलतानाचें निशाण फडकत असतें. ब्रिटिश अंमलापूर्वी हिंदी लोक पूर्व आफ्रिकेशीं व्यापार करीत असत. एका ऋतूंत तिकडे जाण्याला वारा अनुकल असतो अशा वेळीं माल भरून गलबतें तिकडे न्यावयाचीं व कांही महिने तिकडे राहून माल विकून परत येण्याला वारा अनुकूल झाला म्हणजे तिकडला माल भरून गलबतें परत हिंदुस्थानाला आणावयाचीं असा क्रम चाले. हल्ली

सुद्धा अशा रीतीने कांही हिंदी गलबतें (त्यांना ढाउ म्हणतात) माल घेऊन मुंबासाला जाऊन तिकडला माल घेऊन परत हिंदुस्थानाला येतात.

पूर्व आफ्रिकेंत इंग्रजांचा अंमल सुरू झाल्याबरोबर राज्यव्यवस्था, रेल्वे, रस्ते वगैरे अलीकडच्या सुधारणेचीं अंगें सुरू झालीं. त्या वेळी निरनिराळ्या खात्यांत काम करण्यासाठी लहान मोठ्या दर्जाचे हिंदी नौकर लोक व सुतार, लोहार, गंवडी वगैरे कारागीर तिकडे पुष्कळ गेले. खासगी धंदा करणारे डॉक्टर, वकील वगैरे लोकांनाही थोडेंसें कार्य-क्षेत्र सापडलें. पूर्व आफ्रिकेंत गोऱ्याच्या खिस्ती लोकांचा भरणा मोठा आहे. लहान मोठा व्यापारी वर्ग तिकडे गेला त्यांत मुसलमान व गुजरात-कडील मंडळी खूप गेली. मुसलमान लोक तिकडे तीन चार पिढ्यांचे स्थायिक झालेले पुष्कळ आहेत. पूर्व आफ्रिकेंत युरोपियन लोकांना कायमची वस्ती करून राहतां येईल, अशीं ठिकाणें फार थोडीं आहेत, ह्यामुळे ह्या भागांत युरोपियन लोक थोडे असून हिंदी व स्थानिक नीग्रो लोक ह्यांचाच भरणा मोठा आहे. स्थानिक लोकांच्या राहण्याच्या जागा शहरापासून दूर वेगळ्या आहेत. ह्यामुळे पूर्व आफ्रिकेंतील शहरांत असतां आपण हिंदुस्थानांतच आहों असें वाटतें व हीं शहरें हिंदुस्थानांतील शहरांप्रमाणे दिसतात. येथे हिंदी लोकांना पुढे सरकण्याला बराच वाव मिळाला. अलीकडे नीग्रो लोकांना तयार करून त्यांना नोकऱ्या द्याव्या, असा क्रम थोड्या प्रमाणाने सुरू झाला आहे. पुढे व्यापाराची मंदी आल्यामुळे हिंदी लोकांची बरीच पीच्छेहाट होत आहे.

दक्षिण आफ्रिकेंतील हवा युरोपियन लोकांच्या वस्तीला चालण्या-सारखी आहे, ह्यामुळे सरकारी आणि रेल्वे खात्यांत तिकडे हिंदी लोकांना वाव मिळाला नाही. शेतांवर, खाणींतून व इतर ठिकाणीं काम करण्या-करिता मजूर लोक मात्र हिंदुस्थानांतून नेण्यांत आले. आरंभीं गेलेल्या मजुरांच्या आता तीन पिढ्या तेथे झाल्या आहेत. हिंदी व्यापारी तिकडे गेले, पण डॉक्टर व वकील लोकांना तिकडे जातां आलें नाही. पूर्व

आफ्रिकेंत हिंदुस्थानांत शिकलेल्या लोकांना वाव मिळाला, पण दक्षिण आफ्रिकेंत इंग्लंडांत शिकलेल्या लोकांना मात्र डाक्टरी किंवा वकिली करण्याची मुभा आहे. तेथील शिक्षणक्रमांत प्राथमिक विभागांत सुद्धा हिंदी भाषांना स्थान नाही. मुलें शाळेंत गेल्याबरोबर इंग्रजीच शिकूं लागतात. हिंदी लोक घरीं आपली भाषा बोलतात, पण तेथेंच जन्मलेल्या लोकांना मातृभाषेचें ज्ञान काय तें थोडें घरच्या बोलण्यांत होत असेल तेवढेंच.

कुलाबा जिल्ह्यांतील तीन चार तालुक्यांतून व रत्नागिरी जिल्ह्यांतील तीन चार तालुक्यांतून मुसलमान मंडळी दक्षिण आफ्रिकेंत पुष्कळ गेली आहे. ह्यांची बायका मुलांसह एकंदर संख्या चार पांच हजार असेल. लहान-मोठीं दुकानें चालवणें व विशेषतः खाटकाचा धंदा,हे यांचे उद्योग आहेत. हे दहा पांच वर्षांनी एकदा आपल्या घराकडे येऊन जातात. ह्यांनी तिकडल्या पैशावर इकडल्या प्रान्तांत बराच जमीनजुमला केला आहे.

मेरू आणि मांदार ह्या पर्वतांचा उल्लेख आपल्या जुन्या ग्रंथांत आहे. टँगॅनिका प्रान्ताच्या सीमेजवळ मोशी हें शहर किलिमांजारो पर्वताच्या पायथ्याशीं आहे. किलिमांजारो ह्या शब्दाचा पहिला भाग स्थानिक भाषेंत पर्वताचा वाचक असून दुसरा भाग मांदार ह्याचा अपभ्रंश आहे, असें प्रतिपादलें जातें. मांदार (मांजारो) पर्वत समुद्रसपाटीपासून १६००० फूट उंच असून त्याचें शिखर नेहमी बर्फानें आच्छादलेलें असतें. तें स्पष्ट दिसावें म्हणून मी मुद्दाम त्या बाजूला फिरावयास गेलों होतों. मोशीपासून पंचावन्न मैलांवर अरुशा म्हणून शहर आहे. तें मेरू पर्वताच्या पायथ्याशींच आहे. ह्या पर्वताच्या बाजूनेहि मी फिरावयास गेलों होतों. हे दोन्ही पर्वत जवळ जवळ असल्यामुळेच त्यांस मेरु-मांदार असें म्हणण्याचा प्रघात पडला असावा. प्राचीन हिंदु लोकांच्या परिचयाचे मेरु-मांदार पर्वत कदाचित् हिंदुस्थानांतच कोठे तरी असतील.आफ्रिकेंतील पर्वतांना हीं नांवें प्राचीनकाळीं तिकडे गेलेल्या हिंदी लोकांनी दिलीं असावीं.

ब्रिटिश अमलाखाली असलेल्या पूर्व व दक्षिण आफ्रिकेंत आर्यसमाजी प्रचारकांनी फार चांगलें काम चालवलें आहे. बहुतेक मोठ्या शहरांतून

आर्यसमाजमंदिर व समाजाच्या देखरेखीखाली चालणाऱ्या मुलांमुलींच्या शाळा आहेत. मधून मधून हिंदुस्थानांतील व्याख्यातेहि तिकडे जाऊन प्रचाराचें काम करितात. मी तिकडे असतां पंजाबांतील हुशारपूरच्या डी. ए. व्ही. कॉलेजचे व्हाइस प्रिन्सिपॉल मुद्दाम आठ दहा महिन्यांची रजा घेऊन पूर्व व दक्षिण आफ्रिकेंत हिंडत होते. युरोपियन लोकही त्यांच्या इंग्रजी व्याख्यानांना येत असत. दक्षिण आफ्रिकेंत स्थायीक झालेल्या मद्रासी लोकांनी हिंदुस्थान मुळीच पाहिलें नसल्यामुळे त्यांजमध्ये हिंदुत्वाची जागृति आणि हिंदुस्थानविषयी प्रेमभाव उत्पन्न करण्याच्या कामीं ह्या प्रयत्नांचा फार उपयोग होतो.

पूर्व आणि दक्षिण आफ्रिकेंत मोठमोठ्या शहरीं हिंदूंचीं देवळें आणि स्मशानें आहेत. स्मशानें इकडल्यापेक्षाही चांगल्या स्थितींत असलेलीं आढळलीं. अर्थात् हें सर्व अलीकडे हिंदु लोक तिकडे गेल्यानंतरचें आहे. ट्रान्सवालमधील जोहान्सबर्ग येथे प्रेतें जाळण्याची व्यवस्था नमुनेदार आहे. अलीकडे कांही युरोपियन लोकांमध्येही प्रेतें जाळण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे. असे कांही युरोपियन लोक हिंदूंच्या ह्या स्मशानभूमींत आपलीं प्रेतें जाळतात. मी तेथे असतां युरोपियनांसाठी क्रीमेटरी बांधण्याचें ठरलें होतें, त्याप्रमाणे ती आतां तयार झाली असेल.

आम्हां दक्षिणी लोकांत धाडसाने उद्योगधंद्यासाठी परदेशांत जाण्याचा वकूब नाही. नोकरी मिळाली तर दक्षिणी लोक पाहिजे तिकडे जातील. नाही म्हणायला हाताच्या बोटांवर मोजण्याइतके थोडेसे डॉक्टर व वकील पूर्व आफ्रिकेंत खासगी धंदा चालविण्यासाठी गेले आहेत. माझ्या एवढ्या प्रवासांत दारेसलाम येथे पुष्कळसे दक्षिणी लोक आढळले. हे बहुतेक सरकारी नोकरींत आहेत. ह्यांनी येथे महाराष्ट्र मंडळ स्थापन केलें आहे. लहानशी इमारत असून तींत लायब्ररी आहे. त्या इमारतींतच नवीन कोणी पाहुणा आल्यास त्याच्यासाठी दोन खोल्या आहेत. बाजूला मोकळी जागा आहे. ती खेळण्याच्या, मोकळ्यावर बसण्याच्या, अगर सभेच्या उपयोगी पडते. ह्या ठिकाणीं माझें मराठींत व्याख्यान झालें.

त्यावेळीं पस्तीस पुरुष व १५ बायका होत्या. टँगानिका प्रांतांत पन्नास साठ दक्षिणी डॉक्टर ( बहुतेक सब असिस्टंट सर्जन् ) सरकारी नौकरींत आहेत.

दक्षिण आफ्रिकेंत सुरतेकडील मोची लोक पुष्कळ गेले आहेत व त्यांची स्थिति चांगली सुधारली आहे. ह्यांतले बरेच आर्यसमाजी झाले आहेत. हे तिकडे मोच्याचाच धंदा करतात व तो चांगला चालतो. ह्यांनी तिकडे आपलीं मंडळें स्थापन केलीं आहेत. त्यांच्या बऱ्याच सभा होतात. त्यांच्या सभांतून माझीं व्याख्यानें झालीं. कित्येकांकडे मी चहा-साठी गेलों होतों. केपटाऊनमध्ये ह्यांचा मोठा समाज आहे. आपल्या जातीच्या प्रगतीसाठी यांचे सारखे यत्न चालले आहेत. ह्यांच्याकडूनही मला मदत मिळाली. लेडी स्मिथ येथील कांही मंडळींनी मला भोजनास बोलावलें होतें. त्यांच्या बायकाही हुशार झाल्या आहेत. ही मोची मंडळी कोणत्याहि रीतीने इतर समाजांहून भिन्न वाटत नाही, इतकी त्यांची राहणी सुधारली आहे.

मद्रास इलाख्याशिवाय हिंदुस्थानच्या बाकीच्या भागांत ज्याप्रमाणे प्रान्तिक भाषा असल्या तरी त्यांच्याहून फारशी भिन्न नसलेली हिंदु-स्थानी भाषा सर्वांस समजते त्याप्रमाणे केनिया, युगांडा, टँगॅनिका आणि झांझिबार ह्यांत थोड्या फरकाच्या वेगळ्या भाषा असल्या तरी स्वाहिली भाषा सर्व साधारण आहे. ही भाषा रोमन लिपींत लिहिण्याची वहिवाट पडली आहे. मिशनरी लोकांनी ह्या भाषेंत शिक्षण देण्याच्या शाळा काढल्या आहेत व ह्या भाषेंत बायबलचें भाषान्तर छापलेलें आहे.

केनिया, युगांडा आणि झांझिबार ह्या ठिकाणीं पूर्वी रुपयांत व्यवहार होता. झांझिबारमध्ये अजून रुपये, अधेल्या, पावल्या वगैरे चालतात, पण आणेल्या वगैरे निकेलचीं नाणीं चालत नाहीत. आता केनिया, युगांडा आणि टँगॅनिका ह्या प्रांतांत पौंड, शिलिंग, पेन्स ह्यांत व्यवहार न चालतां शिलिंग आणि सेंट ( शिलिंगचा शंभरावा भाग) ह्यांत चालतात.

मोठाल्या रकमा सुद्धा पौंडांत न सांगतां पांचशे शिलिंग, हजार शिलिंग अशा रीतीने जमाखर्चांत दाखविल्या जातात. दक्षिण आफ्रिकेंतला व्यवहार मात्र पौंड, शिलिंग, पेन्स, ह्यांत चालतो.

आफ्रिकेंत झाड झाडोरा पुष्कळ असून जिकडे तिकडे हिरवेंगार असतें. बहुतेक बारा महिने पाऊस असल्यामुळे झाडामाडांना पाणी घालावें लागत नाही. पूर्व आफ्रिकेंत ऊष्ण प्रदेशांतील फळें, आंबे, फणस, मुसंबीं, अननस, नारळ वगैरे पुष्कळ आहेत. तिकडे हपूस किंवा पायरीचे आंबे नसतात; पण मोठे रसाळ व गोड आंबे असतात. आंब्यांचे वर्षांतून दोन मोसम असतात. झांझिबारमध्ये लवंगांची लागवड मोठ्या प्रमाणांत आहे. एका काळीं जगांत खपणाऱ्या लवंगांचा बहुतेक भाग झांझिबारमधून जात असे. आता इतर ठिकाणींही लवंगांची लागवड झाली आहे. दक्षिण आफ्रिकेंत थंड देशांतील फळें मिळतात. दक्षिण आफ्रिकेंतलीं फळें पूर्व आफ्रिकेंत आणि यूरोपांत पुष्कळ जातात.

डर्बानपासून सोळा सतरा मैलांवर फिनिक्स म्हणून गाव आहे. त्या गावापासून दूर फिनिक्स सेट्ल्मेंट नांवाची वसाहत महात्मा गांधींनी कांही वर्षे चालविली होती. ह्या वसाहतींत वानप्रस्थ वृत्तीने राहणारे हिंदी व इंग्रज स्त्रीपुरुष राहत. वसाहतीची एकंदर शंभर एकर जमीन आहे. ह्या जमिनींत ही मंडळी शेतकी व बागाइत करीत. महात्मा गांधी पुष्कळ वेळां येथून डर्बानला चालत जात येत व कधी कधी त्यांचे मुलगेही तसेच त्यांच्याबरोबर जात. तेथे त्यांनी एक छापखाना चालविला होता व त्यांतून इंडियन ओपिनियन म्हणून साप्ताहिक वर्तमानपत्र इंग्लिश, गुजराती, तामिळ आणि हिंदी अशा चार भाषांत प्रसिद्ध करीत. त्या वेळीं तेथे लहान लहान घरें बांधून बरींच कुटुंबें राहत होतीं. हल्ली तेथे महात्मा गांधींचे चिरंजीव मणिलाल गांधी आपली पत्नी आणि लहान मुलगी यांसह राहतात. त्यांजकडे मी दोन तीन वेळां गेलों होतों. त्यांची पत्नी पुष्कळ वर्षे अकोल्यास राहत होती ह्यामुळे तिला

मराठी भाषा उत्तम येते. तिचें शिक्षण मराठींतूनच झालें होतें. मणिलाल गांधी छापखाना व इंडियन ओपिनियन पत्र चालवतात. आता तें इंग्रजी आणि गुजराती ह्या दोनच भाषांत चालतें. ह्या इस्टेटीचा महात्माजींनी ट्रस्ट करून ठेवला आहे.

जोहान्सबर्गपासून एकोणीस मैलांवर टॉलस्टॉय फार्म म्हणून एक ठिकाण आहे. तें आता पवित्र क्षेत्र झालें आहे. महात्माजींनी ट्रान्सवाल-मध्ये जो सत्याग्रह केला त्याचें केंद्र जोहान्सबर्ग शहर होतें. त्या वेळचे महात्माजींचे सहकारी जर्मन गृहस्थ कालेनबाख ( Kallenbach ) ह्यांच्या मालकीची ती जागा आहे. एकंदर क्षेत्र अकराशे एकर आहे. कालेनबाख ह्यांनी ती सत्याग्रहाच्या उपयोगासाठी महात्माजींना दिली होती. त्या जागेंत झोपड्या बांधून जे लोक सत्याग्रह करून तुरुंगांत गेले त्यांच्या बायकामुलांची राहण्याची सोय तेथे केली होती. टॉलस्टॉय हयात असतां त्याला पत्र लिहून त्याची संमति आणून महात्माजींनी टॉलस्टॉय फार्म हें नांव त्या जागेला दिलें होतें. महात्माजी किती वेळां तरी तेथे चालत जात व परत येत. आता त्या जागीं फक्त एक लहानसें घर आहे. हिंदी लोकांना तें एक यात्रेचें ठिकाण झालें आहे. श्रीनिवास शास्त्री तें पाहण्यासाठी गेले होते. तेथे जाण्याची मीं इच्छा दर्शविली तेव्हा मणिलाल गांधी यांनी कालेनबाखला सांगितल्याबरोबर त्यांनी आपल्या मोटारमधून मला नेलें व तेथे दोन तास सर्व दाखवून परत आणलें.

# प्रकरण अठाविसावें

## प्रवासाचे उद्देश कितपत साधले

विद्यापीठाच्या कार्याचा प्रसार करणें, हा एक माझ्या प्रवासाचा मुख्य हेतु होता. ज्या ज्या ठिकाणीं मी गेलों त्या त्या ठिकाणीं हिंदी लोकांमध्ये प्रचाराचें काम चांगलें झालें. यूरोपांत आणि अमेरिकेंत हिंदी विद्यार्थ्यांचा भरणा मोठा. दहा पंधरा विद्यार्थी एके ठिकाणीं असले म्हणजे त्यांची इंडियन असोसिएशन असावयाचीच. ह्या असोसिएशनमार्फत माझें व्याख्यान व्हावयाचें. अशा व्याख्यानाला हिंदी विद्यार्थ्यांचे युरोपियन अगर अमेरिकन मित्र, विद्यार्थी व विद्यार्थिनी व ओळखीच्या स्त्रियाही येत असत. यूरोपांत हिंदी व्यापारी दोनच ठिकाणीं आढळले. पारिस येथे मोत्यांचे व्यापारी आणि आंत्वर्प येथे हिऱ्यांचे व्यापारी. ह्या दोन्ही ठिकाणीं व्यापारी वर्गासाठी व्याख्यानें झालीं. लंडन येथे हिंदी व्यापाऱ्यांची सभा आहे. तिचे मार्फत काम करणें शक्य झालें नाही. परंतु तेथे इंडियन सोशल क्लबमार्फत तें काम होऊं शकलें. आशियांत आणि आफ्रिकेंत जेथे जेथे मी गेलों तेथे तेथे हिंदी व्यापारी आहेत व बहुतेक ठिकाणीं इंडियन नॅशनल कान्ग्रेसची शाखा आहे. ह्या सर्व ठिकाणीं व्यापारी संघामार्फत किंवा कान्ग्रेसच्या शाखेमार्फत व्याख्यानें होत. आफ्रिकेंत बऱ्याच ठिकाणीं हिंदी स्त्रियांसाठी वेगळ्या सभा भरवून व्याख्यानें देत असें. आशियांत व आफ्रिकेंतल्या व्यापाऱ्यांसाठी आणि स्त्रियांसाठी मी गुजराती भाषेंत व्याख्यान लिहून घेतलें होतें, तें वाचीत असें व इंग्रजी जाणणाऱ्यांसाठी इंग्रजींत व्याख्यान वेगळें होत असे. जेथे हिंदी भाषा जाणणाऱ्यांचा भरणा विशेष असे, तेथे मीं इंग्रजींत बोलावें व त्याचा सारांश हिंदीमध्ये कोणीतरी सांगावा, असें करावें लागत असे. अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील शेतकी काम करणाऱ्या शीख व इतर

पंजाबी लोकांसाठी दोन तीन वेळां व इतर ठिकाणींही दोन तीन वेळां असें करावें लागलें. आफ्रिकेंतल्या मोठमोठ्या शहरांत गुजराती लोकांचीं अर्धें इंग्रजी आणि अर्धें गुजराती अशीं दैनिक वर्तमान पत्रें आहेत. त्यांच्या साह्याने हिंदी लोकांत प्रसाराचें काम बरेंच होत असे. अगाऊ लोकांना कळल्यामुळे सभेला. मंडळी चांगली जमे व ज्या लहान शहरीं मी जात असें तेथेहि हीं पत्रें जात असल्यामुळे लोकांना अगाऊ माहिती मिळे. दुसरें, अशीं इकडील माणसें त्या प्रान्तांत क्वचितच जात असल्यामुळे लोकांमध्येही एक प्रकारची उत्सुकता उत्पन्न होई.

युरोपियन व अमेरिकन स्त्रीपुरुषांमध्ये काम करण्याची तऱ्हा वेगळी होती. त्या लोकांमध्ये हिंदी लोकांविषयी माहिती मिळविण्याबद्दल जिज्ञासा असे. जिनीव्हा व एल्सिनोर येथील संमेलनप्रसंगींहि कांहीं व्याख्यानें करतां आलीं. पण विशेष फायदा हा झाला की, तेथे ठिकठिकाणच्या लोकांच्या ओळखी झाल्या व पुढे ज्या ज्या ठिकाणीं आम्हांस जावयाचें होतें, त्या त्या ठिकाणच्या मंडळींची प्रत्यक्ष गांठ घेतां आली. ह्यामुळे आम्ही जाण्यापूर्वी एखादा दिवस किंवा त्याच दिवशीं स्थानिक वर्तमानपत्रांत आमच्यासंबंधाची माहिती व पुष्कळ ठिकाणीं माझा फोटोहि प्रसिद्ध व्हावा, अशी तजवीज अगाऊ करून घेतां येत असे. ह्यांच्या सभांमध्ये माझ्या व्याख्यानाचा विषय हिंदुस्थानांतील स्त्रीशिक्षण, किंवा हिंदुस्थानांतील महत्त्वाचे सामाजिक प्रश्न असा असे. ह्यांत जातिभेद, अस्पृश्यता, स्त्रियांचा पडदा, बालविवाह, विधवा-विवाह, स्त्रीशिक्षण ह्यांपैकी कांहीबद्दल थोडेंसें सांगून शेवटीं विद्यापीठा-बद्दल हकीकत सांगत असें. मजजवळ संस्थेची प्रगति दाखविणाऱ्या मॅजिक लॅंटर्न स्लाइड्स् होत्या, त्या शक्य तेथे दाखवीत असें. तिकडे यंग मेन्स ख्रिश्चन असोसिएशन, थिआसॉफिकल सोसायटी, इन्टर नॅशनल् असोसिएशन फॉर पीस अॅंड फ्रीडम् ह्या संस्थांच्या शाखा जिकडे तिकडे आहेत. त्यांच्या मार्फत त्यांच्या सेक्रेटरींना अगाऊ लिहून व्याख्यानें जुळवितां येत असत. अमेरिकेंतील मोठाल्या हायस्कुलांत व कॉलेजांत

मोबदला देऊन विद्वानांचीं, विशेषतः परकी देशांतील माणसांचीं व्याख्यानें करविण्याचा प्रघात आहे. पण हा त्यांचा कार्यक्रम चार सहा महिने अगाऊ ठरविण्यांत येत असतो. आमचा तिकडे जाण्याचा बेत एकदम झाल्यामुळे अगोदर सर्व कार्यक्रम ठरवून त्या कॉलेजांच्या अधिकाऱ्यांना लिहिणें शक्य झालें नाही. तथापि बऱ्याच हायस्कुलांतून आणि कॉलेजांतून व्याख्यानें देण्याची संधि मिळाली व कित्येकांनी प्रवासखर्च किंवा थोडा मोबदलाही दिला. अर्थात् तो वर्गणी म्हणून जमा झाला.

अमेरिकन लोक अतिशय उद्योगी असल्यामुळे व संध्याकाळचा वेळ खेळ आणि करमणूक ह्यांसाठी द्यावयाचा असल्यामुळे संभाषणाला वेळ मिळावा ह्या हेतूने दुपारीं लंचसाठी मंडळी तासभर एकत्र जमतात. असे स्त्रीपुरुषांचे क्लब अमेरिकेंत जिकडे तिकडे आहेत. ह्या प्रसंगीं पहिला अर्धा तास लंच व खासगी संभाषण ह्यांत घालवून दुसऱ्या अर्ध्या तासांत कोणाचें व्याख्यान होण्यासारखें असल्यास करावें असा प्रघात आहे. अशा वेळीं व्याख्यान देण्याची मला पुष्कळ ठिकाणीं संधि मिळाली. इंग्रजी भाषा प्रचालित होती तेथें अर्थात् इंग्रजींत व्याख्यानें होत. पण युरोपांतील देशांत बहुधा इंग्रजी जाणणारांसाठी एक व्याख्यान व इंग्रजी न जाणणाऱ्या लोकांसाठी दुसरें व्याख्यान अशी व्यवस्था करावी लागे. अशा प्रसंगीं मीं थोडेसें बोलावें, नंतर कोणी त्याचें स्थानिक भाषेंत भाषांतर करावें, पुन्हा मीं बोलावें, अशा रीतीने व्याख्यान संपेपर्यंत चालवावें लागे. बरेंच इंग्रजी समजतें असा समाज असला तरी आरंभीच्या व अखेरच्या बोलणारांनी स्थानिक भाषेंतच बोलावें व शेवटीं भाषणाचा सारांश थोडक्यांत सांगावा असें होत असे.

व्याख्यानानंतर व्याख्यात्याला अनेक प्रकारचे प्रश्न विचारावे व व्याख्यात्याने त्यांचीं उत्तरें द्यावीं असा प्रघात यूरोपांत व अमेरिकेंत आहे. गांधी व टागोर हीं नांवें सगळ्या सुशिक्षित जगाला माहीत झालीं आहेत. त्यांच्यामुळे हिंदुस्थानाविषयी जिज्ञासा वाढत आहे. मला त्यांच्या संबंधाने

व सामाजिक चालीरीतींसंबंधाने अनेक प्रश्न विचारले जात व त्यांचीं उत्तरें देतांना अतिशयोक्तीने वर्णन केलेलीं पुस्तकें वाचून कांही अनिष्ट चालींसंबंधाने झालेले गैरसमज दूर करण्याची आयतीच संधि मिळे. माझ्या व्याख्यानांत अनिष्ट सामाजिक चाली नाहीशा करण्यासंबंधाने हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोकांचे किती नेटाचे प्रत्यन चालले आहेत, ह्याचाही मी उल्लेख करीत असें. एकंदरीत माझ्या यूरोपांतील आणि अमेरिकेंतील प्रवासाने बऱ्याच लोकांच्या मनांतील हिंदुस्थानाविषयीचे गैरसगज कांही अंशीं दूर होऊन खरी माहिती मिळवण्याविषयी जिज्ञासा उत्पन्न झाली व हिंदुस्थानच्या आकांक्षांविषयी सहानुभूतीचें क्षेत्र थोडेंसें तरी वाढलें.

विद्यापीठासाठी द्रव्याची मदत मिळवणें हा दुसरा प्रमुख हेतु होता. हाही कांही अंशीं साधला, असें म्हणण्यास हरकत नाही. ह्या मदतीचा मोठा भाग हिंदी व्यापारी व हिंदी विद्यार्थी ह्यांकडूनच मिळाला. हिंदी लोकांपुढे व्याख्यान दिलें म्हणजे शेवटीं मदतीबद्दल विनंती करीत असें व नंतर त्यांजकडे जाऊन वर्गणीची मागणी करीत असें. युरोपियन किंवा अमेरिकन स्त्रीपुरुषांच्या सभेंत वर्गणीबद्दल प्रत्यक्ष विनंती करीत नसें. वर्गणीसाठी कसकसे प्रयत्न केले येवढें सांगून कोणी कांही मदत केल्यास आभारपूर्वक स्वीकार केला जाईल येवढें दर्शवीत असें. त्यांजकडे प्रत्यक्ष विनंती करण्यास जात नसें. येवढ्या सूचनेचाही उपयोग होऊन कांही लोक मदत पाठवीत किंवा एखादी बाई व्याख्यान संपल्यावर हातांत टोपी घेऊन हिंडे व जागच्या जागीं थोडीशी वर्गणी जमा होई. अशा रीतीनेही कांही मदत मिळाली व कांहींनी आम्ही परत आल्यावरही पाठविली.

यूरोपांत आणि अमेरिकेंत कोणाच्या घरीं उतरणें शक्य नसल्यामुळे हॉटेलांत किंवा हॉटेलवजा खासगी कुटुंबांत उतरावें लागे. ह्यामुळे प्रवासखर्च फार आला. पहिल्या तेरा महिन्यांच्या प्रवासांत वर्गणीचें उत्पन्न साडेसत्तावीस हजार झालें व खर्च साडेबारा हजार रुपये आला. म्हणजे

निवळ पंधरा हजार रुपये विद्यापीठाला मिळाले. दुसऱ्या आफ्रिकेच्या सफरींत वर्गणीचें उत्पन्न चौतीस हजार झालें व खर्च दोन हजारच झाला. अशा रीतीनें हिंदुस्थानाबाहेरून सत्तेचाळीस हजार रुपये विद्यापीठाकडे आले.

यूरोप अमेरिकेंतील प्रवासांत शिक्षणविषयक संस्था पाहणें हाही आमचा एक उद्देश होता. यूरोपांत आणि अमेरिकेंत मुलींचीं हायस्कुलें आणि कॉलेजें पुष्कळ पहावयास मिळालीं. आमचें विशेष लक्ष शारीरिक व्यायाम व प्रपंचशास्त्र आणि आरोग्यशास्त्र ह्या विषयांना किती महत्व दिलें जातें, हें पहाण्याकडे होतें. बहुतेक हायस्कुलांतून अनेक प्रकारच्या व्यायामांसाठी शाळेच्या इमारतींतच मोठमोठीं दालनें ठेवलेलीं आहेत. हातांपायांच्या व शरीराच्या अनेक प्रकारच्या हालचाली नियमितपणें पियानोच्या तालबद्ध नादावर किंवा एरव्ही पण ठेक्यावर एकदम सर्वांच्या सारख्या होतील, असें शिक्षण त्यांस दिलें जातें. अंग पाहिजे तसें वळावें ह्या दृष्टीनें इतरही व्यायामाचे प्रकार आहेत. व्यायामाच्या वेळीं पोषाक बदलावयाचा असतो. त्यासाठीं व्यायामशाळेला लागूनच एक खोली असते व तींत कपाटें असून त्यांत अनेक खण असतात. प्रत्येकीनें आपले वर्गांतील कपडे काढून व्यायामाचे कपडे घालावे आणि व्यायामशाळेंत यावें. व्यायामाचा तास संपल्यानंतर हे कपडे बदलून पुन्हा पहिले घालावे व वर्गांत जावें. चांगल्या हवेच्या वेळीं शाळेजवळच्या उघड्या मैदानांतही ड्रिल घेतली जाते. व्यायामाच्या दृष्टीनें पोहण्याकडेहीं विशेष लक्ष दिलें जातें. बऱ्याच शाळांतून पोहण्यासाठीं कृत्रिम तलाव असून त्यांच्या सभोंवतीं व वर आच्छादन असतें. वाईट पाणी काढून नवें भरण्याचीही सोय असते व थंडीच्या दिवसांत असे तलाव कोमट पाण्यानें भरले जातात.

मुलींच्या शरीर प्रकृतीकडे विशेष लक्ष देण्यासाठीं प्रत्येक हायस्कुलांत एक कायमचा डाक्टर असतो. तो रोगट मुलींच्या पालकांना शाळेच्या अधिकाऱ्यांमार्फत योग्य सूचना देतो. दातांच्या संबंधानें विशेष लक्ष दिलें

जातें व दातांची परीक्षा करण्यासाठी बहुधा एखाद्या दंत-वैद्याची योजना केलेली असते.

यूरोपांतल्या व अमेरिकेंतल्या मुलींच्या शाळांतून आणि कॉलेजांतून प्रपंचशास्त्र आणि आरोग्यशास्त्र ह्या विषयांकडे विशेष लक्ष दिलें जातें. शिवणकाम, स्वयंपाक, कपडे धुणें, कपबशा विसळणें, मिचकट भांडीं स्वच्छ करणें, अंथरूणें पांघरुणें साफसूफ करणें, घर झाडून पुसून स्वच्छ टेवणें शरीराची स्वच्छता, घरासभोवतालची स्वच्छता वगैरे सर्व गोष्टींचा समावेश ह्या विषयांत होतो व ह्यासंबंधाचें प्रत्यक्ष शिक्षण देण्याची सोय असते. ह्या विषयाच्या शिक्षकिणी तयार करण्याच्या शाखा कित्येक शाळांना जोडल्या आहेत व त्यासाठी कांही स्वतंत्र कॉलेजेंही आहेत. यूरोपांत आणि अमेरिकेंत गृहव्यवस्थाशास्त्रांत सर्टिफिकेट मिळविलेल्या स्त्रियांना मागणी चांगली आहे. श्रीमंत लोकांकडे अशा बायांना नोकरीस ठेवून त्यांजवर गृहव्यवस्था सोपविली जाते. ह्यामुळे अशा स्त्रिया तयार करण्याकडे विशेष लक्ष दिलें जातें व औद्योगिक दृष्टीने कांही स्त्रिया ह्या शिक्षणाकडे वळतात. कांही कॉलेजांतून प्रपंच शास्त्र (Domestic Science किंवा Home Economies) हा विषय ऐच्छिक घेऊन बी. ए. होतां येतें. कित्येक युनिव्हर्सिट्यांत ह्या विषयाच्या एखाद्या शाखेंत संशोधन करून पीएच्. डी. ची पदवी मिळवतां येते. जपानांतल्या स्त्रियांच्या युनिव्हर्सिटींत ह्या विषयाकडे विशेष लक्ष दिलें जातें. जपानी पाकशास्त्र व पाश्चात्य पाकशास्त्र, त्याचप्रमाणे जपानी राहणी व रीतभात आणि पाश्चात्य राहणी आणि रतिभात ह्यांचें शिक्षण देण्याच्या वेगळ्या शाखा आहेत. जपानांत मोठ्या शहरांत यूरोपियन पद्धतीने राहणारे बरेच लोक आहेत. जपानांत रीतीभातीला फार महत्व दिलें जातें. आम्ही एका शाळेंत गेलों असतां चहा आणून द्यावयाचा तो देखील किती पद्धतशीर द्यावा लागतो, हें दाखवण्यासाठी आम्हांला चहा देण्यांत आला. मुलीने कोणीकडून कशी पावलें टाकीत यावें. किती वाकावें, चहा खाली ठेवल्यावर मान खाली घालून आदबीने पाहुण्याकडे

पाहून आनंद प्रदर्शित करून कशीं पावलें टाकीत परत जावें, हें एक शास्त्रच झालें आहे.

स्त्रियांना आणि पुरुषांना एका ठिकाणीं शिक्षण देण्याचा प्रघात यूरोपांत आणि अमेरिकेंत पडत चालला आहे व त्या संबंधाचा विरोध नाहीसा झालेला आहे. पूर्वीपासून चाललेलीं स्त्रियांचीं हायस्कुलें आणि कॉलेजें सर्वत्र पुष्कळ आहेत आणि अशा शाळाकॉलेजांत शिकणाऱ्या स्त्रियांचीच संख्या सहशिक्षणाच्या शाळाकॉलेजांतून शिकणाऱ्या स्त्रियांच्या संख्येपेक्षा अधिक भरेल. ह्याचें एक कारण मोठमोठ्या देणग्या देऊन जीं स्त्रियांचीं हायस्कुलें आणि कॉलेजें स्थापलेलीं आणि वर्षानुवर्ष चाललेलीं आहेत तीं तशींच चालू राहणार. नवे खासगी प्रयत्न सहशिक्षणासाठी होत आहेत व पुढे होतील आणि त्यांचें प्राबल्य झालें म्हणजे लोकमताने चालणारीं तिकडील सरकारेंही अशा प्रयत्नांना उत्तेजन देतील. मुलांमुलींनी आणि स्त्रीपुरुषांनी मिळून मिसळून वागण्याची चाल तिकडे फार वर्षे रूढ असल्यामुळे सहशिक्षणाचा प्रयोग तिकडे लवकर यशस्वी झाला. आपल्या देशांत हायस्कुलांतून व कॉलेजांतून जें सहशिक्षण चाललें आहे तें बरचसें नाइलाजामुळे असून तें खरें सहशिक्षणच नव्हे. कारण शिक्षक अगर प्रोफेसर वर्गात आल्यावर मुलींनी यावें व तास संपल्यानंतर आधी मुलींनी बाहेर जावें व मागून शिक्षकांनी जावें आणि इतर वेळींहि एकमेकांचा फारसा संबंध येऊं नये, अशा शिक्षणाला ‘ सहशिक्षण ’ हें फक्त नांव द्यावयाचें इतकेंच. ज्या पालकांची मुलींना शिकवण्याची इच्छा तीव्र असते ते मुलींसाठी शाळाकॉलेजें नसलीं म्हणजे आपल्या मुली मुलांच्याच शाळाकॉलेजांत पाठवितात. पण पालकांना व शाळाकॉलेजाच्या व्यवस्थापकांना मुली मुलांत मिसळल्या किंवा त्यांजबरोबर खेळल्या तर आवडत नाही. बदलत जाणाऱ्या परिस्थितींत लोकमत हळूहळू सहशिक्षणाला अनुकूल होत जाण्याचा संभव आहे. जपानी लोक अनेक बाबतींत पाश्चात्यांचें अनु-

करण करणारे असूनहि सहाशिक्षणाला ते अगदी विरुद्ध आहेत. दहा वर्षांच्या आंतील मुलांमुलींचें शिक्षण एकत्र होऊं शकतें पण मुलींचीं हायस्कुलें आणि कॉलेजें वेगळींच असलीं पाहिजेत, असें जपानी लोकांचें मत आहे. एरव्ही स्त्रियांना स्वतंत्रता पुष्कळ आहे. त्या मोकळेपणीं कोठेही हिंडूं फिरूं शकतात, ऑफिसांतून कामें करतात व बाजारहाट करतात. हें सर्व स्वातंत्र्य जपानी लोकांनी स्त्रियांना दिलें आहे, पण सहाशिक्षणाला त्यांचा विरोध आहे, हें जरा चमत्कारिक दिसतें.

तिकडे सर्व ठिकाणीं मातृभाषेंतूनच शिक्षण मिळत असल्यामुळे मुलां-मुलींना अभ्यासाचा ताण कमी पडतो. त्यांना दुसरी भाषा शिकावी लागते पण आपल्याकडे इंग्रजी संबंधाने मुलांच्या ज्ञानाची जी अपेक्षा असते, ती तिकडे दुसऱ्या भाषेसंबंधाने नसते. तिकडल्या खासगी हाय-स्कुलांची व कॉलेजांची सांपत्तिक स्थिति इकडल्या मानाने किती तरी चांगली असते. शिस्त आणि नीटनेटकेपणा ह्या बाबतींत आम्हीं त्यांचें अनुकरण करणें जरूर आहे.

# प्रकरण एकोणतिसावें

## गृहस्थाश्रम ( उत्तर भाग )

माझी पत्नी आनंदीबाई माझ्याप्रमाणेच काटकसरीने वागणारी असल्यामुळे बेताच्या प्राप्तींत आम्हांला सुखाने संसार करतां आला व थोडेंसें सार्वजनिक कार्यहि करतां आलें. वेडावाकडा प्रसंग आल्यास दुसऱ्यापुढे तोंड वेंगाडण्याची वेळ येऊं नये म्हणून मीं आनंदीबाईला सद्तीस वर्षांपूर्वी नागपूरच्या डफरिन इस्पितळांत मिडवाइफ्री शिकण्यासाठी पाठवलें. तेथल्या अधिकाऱ्यांनी अपवाद म्हणून आमच्या अडीच वर्षांच्या शंकरला बरोबर येऊं दिलें. ह्यावेळीं खर्च वाचवावा व स्वतःला शिस्त लागावी ह्या हेतूंनीं एक वर्ष स्वयंपाकापासून तो धोतरें धुणें, भांडीं घासणें वगैरे घरांतलें सर्व काम मींच केलें. वडील मुलगा रघुनाथ व पार्वतीबाईचा मुलगा नाना हेही घरांत होतेच. ह्यांचीहि मदत ह्या कामीं होत असे. मिडवाइफ्रीच्या शिक्षणाचा आनंदीबाईला फार उपयोग झाला. सुखवस्तु कुटुंबांत बाळंतपणें करून तिला घरचा व्यवसाय संभाळून स्वकष्टार्जित द्रव्य संपादन करतां आलें व विना वेतन बाळंतपणें करून गरीबांच्या उपयोगीं पडतां आलें. मी खर्चासाठी दिलेल्या पैशांतून बचत करून व अशा रीतीने त्यांत पुष्कळशी भर घालून आज चाळीस वर्षांत तिने व्याजासह बरीच रकम शिल्लक टाकली व त्यांतला मोठा भाग म्हणजे सात हजार रुपये तिने अनाथबालिकाश्रमाला दिले आहेत. त्यांचें व्याज तिच्या हयातींत तिला मिळावयाचें आहे व नंतर ते आश्रमाच्या अक्षय निधींत दाखल व्हावयाचे आहेत. मुलें स्वतंत्रपणें राहूं लागल्यापासून आनंदीबाई आश्रमासाठी भाऊबीज फंड जमविण्याचें व इतर प्रकारें आश्रमाकरिता वर्गणी मिळवळण्याचें काम करीत आहे.

मला मुलगी नसून चार मुलगेच आहेत. त्यांत पहिल्या कुटुंबाचा एक व दुसऱ्याचे तीन हे बरेच बुद्धिमान असल्यामुळे त्यांचें शिक्षण चांगलें होऊन ते आपापल्या पायांवर उभे राहूं शकले. त्यांची थोडीशी माहिती देण्यापूर्वी एका आनंदाच्या प्रसंगाचा येथे उल्लेख करावासा वाटतो. आनंदीबाईंचे तीर्थरूप कांही कामानिमित्त पुण्यास आले होते. ते आम्हांला भेटावयाला आले. जनलज्जा आणि मनलज्जा यांच्यासाठी त्यांनी आमच्या घरीं उतरून अन्नोदकाचें ग्रहण करणें अशक्यच होतें. बाबा, आनंदीबाई व मी अशीं सुखदुःखांच्या गोष्टींत गुंतलों असतां आमचा मुलगा शंकर तेथे आला. त्याला पाहून गहिवरलेल्या स्वराने पुढील वाक्य त्यांच्या तोंडून निघालें. " रामा ! हें तुझें स्वरूप या जगांत कारे कोणाच्या नजरेला पडावयाचें होतें ! पण तुझी लीला अगाध आहे ! " तोंडांतून हे शब्द आणि डोळ्यांतून टप् टप् टप् आनंदाश्रु एकदमच बाहेर पडले, आणि त्यांनी झट्दिशीं मुलाला घेऊन कवटाळलें. हे पुनः एकदा आम्हांला भेटावयास आले होते, त्या वेळीं आश्रम वगैरे पाहून त्यांना फार आनंद झाला. यानंतर बऱ्याच वर्षांनी आपल्या तिन्हीं नातवांना पाहिल्यानंतर बाबा आपल्या वयाच्या ९१ व्या वर्षीं वारले. सर्वांभूतीं परमेश्वर ही त्यांची भावना होती. महार वगैरे अस्पृश्य मानलेल्या जातींविषयी यांचें मन थोर होतें. त्यांचा कंटाळा न करतां उन्हाळ्यांत कांही कामानिमित्त अशीं माणसें थकूनभागून यांजकडे आलीं तर त्यांना ताक वगैरे पाजून तृप्त करून परत पाठवावयाचें, असा यांचा परिपाठ असे.

माझा सर्वांत वडील मुलगा रघुनाथ ह्याचा मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेंत पहिला नंबर आला होता. पुढे तो एम्.ए.होऊन सरकारी कॉलेजांतून गणित विषयाचा पहिल्याने आसिस्टंट व पुढे पूर्ण प्रोफेसर झाला होता. मुंबईंत असतांना त्याने फ्रेंच भाषेचें चांगलें ज्ञान संपादन केलें होतें. पुढे स्वकष्टार्जित द्रव्य संपादन करून बऱ्याच प्रौढ वयांत तो आणखी अभ्यास करण्यासाठी पॅरिस येथे सव्वा वर्ष राहिला व फ्रेंच भाषेचें उत्तम ज्ञान.

संपादन करून तेथील फ्रेंच अकॅडमीची गणित विषयांत Diplome d' Etudes Superieures ही पदवी मिळविली. त्याची चौदा वर्षांची सरकारी नोकरी झाली होती. परंतु आपणापेक्षा कमी योग्यतेच्या नवीन मनुष्याला आपल्यावरची बढतीची जागा दिली, असें पाहून व हा अपमान सहन न होऊन त्याने सरकारी नोकरीचा राजिनामा दिला. हल्ली तो कांही पुस्तकें वगैरे लिहून व इतर थोडा व्यवसाय करून चरितार्थ चालवीत आहे. त्याची बायको मालती ही अनाथबालिकाश्रमांत घेतलेली पहिली कुमारिका. हिची मॅट्रिक्युलेशनची परीक्षा होऊन तिने एक वर्ष कॉलेजांत अभ्यास केला. लग्नानंतर बरींच वर्षें तिने मुलींच्या शाळांतून शिक्षकिणीचें काम केलें.

दुसरा मुलगा शंकर ह्याने एम्. बी. बी. एस्. झाल्यावर महायुद्धांत हिंदुस्थानच्या उत्तर सरहद्दीवर व मेसापोटेमियांत डॉक्टरचें काम केलें. नंतर पूर्व आफ्रिकेंत नायरोबी येथे पांच सात वर्षें काम करून नऊ महिने इंग्लंडांत अभ्यास वाढवून डॉक्टरीच्या कामांत अत्यंत उपयोगी अशी एक्स्-रेच्या साह्याने शरीराच्या भागांचा फोटो घेण्याची कला साध्य करून परत पूर्व आफ्रिकेंत मोंबासा येथे त्याने आपलें काम सुरू केलें आहे. तेथे तो सार्वजनिक कामांतही बरेंच मन घालीत असतो. त्याची बायको रेवती ही महिलाविद्यालयांत अगदी लहानपणीं आलेली मुलगी, पुढे विद्यापीठाची गृहीतागमा झाली. मोंबासांतील मुलींची सरकारी शाळा फार दूर लोकांना गैरसोयीच्या ठिकाणीं नेली, ह्यामुळे सुमारें दीड वर्षापूर्वी तेथील लोकांनी मध्यवस्तीच्या ठिकाणीं खासगी मुलींची शाळा काढली. ह्या शाळेंत रेवतीने पुढाकार घेतला आहे.

तिसरा मुलगा दिनकर हा मुंबई युनिव्हर्सिटीच्या बी. एस्सी. च्या परीक्षेंत पहिला आला होता. पुढे त्याला स्कॉलरशिप् मिळून तो बंगलोरच्या रिसर्च इन्स्टिटयूटमध्ये गेला. तेथे अभ्यास करून त्याने एम्. एस्सी.च्या परीक्षेसाठी निबंध लिहिला. तो प्रशंसनीय ठरून त्याला एम्. एस्सी.ची पदवी मिळाली व या परिक्षे-

बद्दलच त्याला मुंबई युनिव्हर्सिटीचें मूस मेड्ल् मिळालें. नंतर त्याने जर्मनींतील लाइप्झिग् युनिव्हर्सिटींत अभ्यास करून पीएच्. डी. ची पदवी मिळवली. आतां तो डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा आजन्म-सेवक होऊन फर्ग्युसन कॉलेजांत रसायन शास्त्राचा प्रोफेसर आहे. त्याची बायको इरावती ही मुंबई युनिव्हर्सिटीची एम्. ए. झाल्यावर बर्लिन युनि-व्हर्सिटींत अभ्यास करून पीएच्. डी. झाली. हल्ली ती स्त्रियांच्या युनि-व्हर्सिटीची रजिस्ट्रार आहे.

चवथा, सर्वांत लहान मुलगा भास्कर हा मुंबई युनिव्हर्सिटीचा बी. एस्सी. व बी. टी. झाला आणि नंतर लीड्स् युनिव्हर्सिटींत अभ्यास करून एम्. ईडी. ( मास्टर ऑफ़् एज्युकेशन ) झाला. हल्ली तो अनाथ-बालिकाश्रमाच्या मंडळीचा आजन्म-सेवक असून हिंगण्याच्या संस्थांत काम करीत आहे. त्याची बायको कावेरी ही लहानपणींच महिला विद्या-लयांत येऊन पुढे महिला विद्यापीठाची गृहीतागमा झाली. हल्ली ती हिंगण्याच्या महिलाश्रमांत काम करीत आहे.

ज्या संस्थांच्या कामांत माझ्या आयुष्याचा बराच भाग गेला व ज्यांचा मी आजन्म-सेवक झालों त्या संस्थांत माझे दोन मुलगे आजन्म सेवक होऊन काम करीत आहेत हें पाहून मला अतिशय समाधान वाटतें.

सांसारिक माणसाला मुलांचें सर्व चांगलें चाललेलें पाहून आनंद होतोच, पण नातवंडांच्या बाललीला पाहून होणारा आनंद विशेष आहे. शंकरला तीन मुलगे, दिनकरला एक मुलगा व भास्करला दोन मुली आहेत. ह्या सर्वांना अंगाखांद्यावर खेळवण्याचें व त्यांच्या लीला पाहण्याचें सुख आनंदीबाईला व मला लाभलें व अजून लाभत आहे.

मुरूड गावांत जी आमची वडिलार्जित इस्टेट होती तींत मीं मुंबईंत असतां कांहीं भर टाकली होती. वडील बंधूंना एक मुलगा होता तो चवदा पंधरा वर्षांचा असतांनाच मरण पावल्यामुळे व माझ्या मुलांपैकी कोणी

मुरुडास जाऊन राहण्याचा संभव नसल्यामुळे बंधूंच्या संमतीने ती इस्टेट विकून टाकली, तिचे तीन हजार रुपये आले. पैकी एक हजार गरीब आप्तांच्या मदतीकडे लावून राहिलेले दोन हजार हिंगण्याच्या आश्रमाच्या स्वाधीन केले. त्यांचें व्याज माझ्या बंधूंनी आपल्या हयातींत घ्यावें असें ठरवलें होतें. आता ती रक्कम आश्रमाच्या अक्षय निधींत जमा झाली आहे.

अशा रीतीने आमचा गृहस्थाश्रम पुरा होऊन बरींच वर्षे झालीं. हल्ली आम्ही आधुनिक प्रकारच्या वानप्रस्थ आश्रमांत आहोंत, असें म्हटलें तरी चालेल. मी दोन वर्षांपूर्वीच विद्यापीठाच्या वैतनिक सेवेंतून निवृत्त झालों असून अल्प प्रमाणावर अवैतनिक सेवा करीत आहे. डेक्कन एज्युकेशन सोसायटीकडून पेन्शन् मिळत असल्यामुळे निर्वाहाची पंचाइत नाही. आनंदीबाईने स्वपराक्रमाने आपल्या निर्वाहाची तरतूद करून ठेवली आहे. आता आयुष्याचे राहिलेले दिवस घडल्यास थोडीशी सेवा करून नाही तर विश्रान्ति घेण्यांत घालवावे असा आम्हा उभयतांचा विचार आहे.

# प्रकरण तिसावें

## माझे कांहीं स्वभावविशेष

माझ्या भित्र्या व भिडस्त स्वभावाबद्दलचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. त्याचीं आणखीही एक दोन उदाहरणें देण्यासारखीं आहेत. मनी स्कुलांत गेल्यावर लवकरच माझ्या भित्रेपणामुळे मजवर एक प्रसंग गुदरला. या शाळेंत दर दोन महिन्यांनी परीक्षा होत, व परीक्षेच्या नंबरांप्रमाणे स्कॉलरशिपा देत. पांचव्या इयत्तेंत सहा, पांच व चार रुपये अशा तीन स्कॉलरशिपा होत्या. या दरमहाच्या नसून प्रत्येक परीक्षेनंतर एकदा मिळावयाच्या असत. या वर्गांत आठवड्यांतून एकदा घरीं कॉपी लिहून शाळेंत नेऊन दाखवावयाची असे. गणित, इतिहास वगैरे विषयांना जसे शंभर मार्क असत, तसे इंग्रजी कॉपीलाहि शंभर मार्क ठेवले होते. माझें अक्षर अतिशय वाईट, त्यामुळे मला स्कॉलरशिप मिळण्यांत अडथळा येईल, असें मला दिसून आलें. म्हणून मीं अक्षर सुधारण्याचा नेटाने प्रयत्न केला व तो कांहीसा साधला. चवथ्या इयत्तेंतले स्कॉलरशिप मिळविणारे जे विद्यार्थी पांचवींत चढून आले होते, त्यांना असें दिसून आलें की, हा आपल्याबरोबर स्कॉलरशिपच्या कामांत चढाओढ करणार. त्यांची मजवर बारकाईची नजर होती. माझ्या पहिल्या कॉप्या फारच वाईट आल्या होत्या व त्यांवर 'साधारण' (F) असा शेरा मिळाला होता, व या वेळची कॉपी बरी निघून तिजवर 'चांगली' (G) असा शेरा मिळाला. दोन महिन्यांतले शेरे एकत्र करून त्यांजवरून मार्क देत असत. मुरूडचे दामले नांवाचे एक विद्यार्थी माझ्या वर्गांत होते, त्यांचें अक्षर चांगलें होतें. दामले यांनी मला कॉपी काढून दिली असली पाहिजे, असा प्रतिस्पर्धी मुलांनी तर्क केला. जॅक्सन्‌साहेब आमच्या कॉप्या पहात, व इंग्रजी कविता शिकवीत. कॉप्या पाहून झाल्यावर ते आपल्या टेबलावरच त्या ठेवीत व नंतर इंग्रजीच्या तासाला

मुलें आलीं म्हणजे त्या परत देत. मध्यंतरीं ते कोठे गेले म्हणजे एखादा धीट मुलगा अगोदरच जाऊन आपणाला व दुसऱ्या कित्येक मुलांना काय शेरा मिळाला तो पाही. माझ्या एका प्रतिस्पर्धी मुलाने मला 'जी' मिळालेली पाहिल्याबरोबर मीं लबाडी केली असावी, असें त्याला वाटलें व ती उघडकीला आणण्यासाठी त्याने कंबर बांधली. इंग्रजीच्या तासासाठी मुलें जमल्याबरोबर कॉप्या परत देणार, तो हा मुलगा उठला व त्याने माझी व दामले यांची अशा दोन्ही कॉप्या जॅक्सन्‌साहेबांना दाखविल्या. त्यांची मुद्रा उग्र होती व ते फार कडक असल्याबद्दल मुलें बोलत असत. त्यांनाहि तसाच संशय आला व त्यांनी मला उभें केलें. त्यांच्या वर्गात मराठी कोणीं बोलावयाचें नाही, इंग्रजींतच बोललें पाहिजे, असा नियम असे. मराठींत बोलावयाचें असतें तरी माझ्या तोंडून शब्द निघाले असते की नसते, ह्याबद्दल शंकाच आहे! त्यांनी दामले यांना विचारतां आपण कॉपी काढून दिली नाही, असें त्यांनी सांगितलें. तथापि त्यांना तें खरें वाटेना. मी तर घाबरून गेलों व तोंडांतून शब्द निघेना. साहेबांनी एका मुलाला पाठवून वेताची छडी आणविली व अतिशय रागाने मला जवळ बोलावून हात पुढे करण्यास सांगितलें. वयाच्या एकविसाव्या वर्षी असल्या अपराधाबद्दल सगळ्या वर्गासमक्ष अशी शिक्षा भोगावी लागणार, अशा स्थितींत माझ्या अंतःकरणांत जें काहूर उठलें, त्याचें वर्णन शब्दांनी करणें अशक्य आहे! अशा स्थितींत नशीबाला बोल लावण्यासाठी मीं आपल्या कपाळाला हात लावला व तोच छड्या घेण्यासाठी पुढे केला. या अंगविक्षेपाकडे साहेबांचें लक्ष गेलें, व मी कदाचित् निरपराधी असेन, अशी शंका त्यांना आली. 'तूं पुनः कॉपी काढून दाखवितोस काय?' असा इंग्रजींत त्यांनी मला प्रश्न केला व मी 'होय' असें त्याचें उत्तर दिलें. तेव्हा लागलेंच वर्गात जाऊन वर्गाच्या शिक्षकासमक्ष कॉपी काढण्यास त्यांनी मला पाठवलें. मी घाबरलों होतों; त्यामुळे कॉपी तितकी चांगली आली नाही; तथापि पहिल्याने ज्या अगदी वाईट कॉप्या लिहिलेल्या त्याच वहीवर होत्या त्यांपेक्षा किती तरी

चांगली आली. त्यामुळे कॉपी मला कोणी काढून दिलेली नसून माझी मींच काढली, असें सिद्ध झालें व तो प्रसंग टळला. माझ्या अंगीं प्रसंगावधान अगदी नाही. ' मी येथे कॉपी काढून दाखवितों, ' एवढे शब्द जर आरंभींच धैर्याने उच्चारले असते, तर सर्व कांही ठीक झालें असतें. परंतु माझ्या भित्रेपणाला अजूनपर्यंत औषध मिळालेलें नाही.

दुसऱ्याला नाखुष करणें माझ्या अगदी जिवावर येतें. या माझ्या स्वभावामुळे माझ्या मुलांवरसुद्धा कधी माझा दाब नसतो. तीं लहानपणापासूनच माझ्याजवळ अगदी सलगीने व निर्भीडपणें वागूं लागतात. अण्णा आपणांवर रागावतील अशी भीतिच त्यांना वाटत नाही. मोठ्या दोन मुलांना एकदोन वेळां तरी शिक्षेचे प्रसंग आले; पण धाकट्या मुलांना शिक्षा केल्याचें स्मरत नाही. जीं दुसरीं मुलें अभ्यासासाठी मजकडे होतीं, त्यांना रागाचे शब्द बोलण्याचे प्रसंगसुद्धा फार थोडे आले असतील. इतका गोडपणा जगांत चालावयाचा नाही; परंतु तो माझ्या अंगीं खिळल्यामुळे इसापनीतींतील लाकडाच्या ओंड्याच्या राजाप्रमाणे माझी स्थिति होते.

या दोषामुळे दुसऱ्याचे अपराध पोटांत घालण्याकडे माझ्या मनाची प्रवृत्ति फार होते व अपराधाला योग्य शासन मजकडून होत नाही. यामुळे शिस्त राखण्याच्या कामीं माझ्या हातून ढिलाई होते. एक दोन वेळां न्यू इंग्लिश स्कुलांत असिस्टंट सुपरिटेंडेंटचें काम मजकडे आलें होतें. त्या वेळीं मुलें माझ्या या स्वभावाचा फायदा घेत. दरमहाची फी १२ तारखेच्या आंत दिली पाहिजे. उशीर झाल्यास एक पैसाप्रमाणे दंड द्यावा, असा नियम असे. कांही तरी सबबी सांगून दंड माफ करून घेण्यासाठी मुलें मजकडे येत व कधी कधी त्यांना नाखुष करण्याऐवजी मीच त्यांच्या दंडाचे पैसे त्यांच्याजवळ देऊन त्यांना परत पाठवीत असें.

कै. नामदार गोखले मित्रमंडळींमध्ये मला विनोदाने ' गोब्राह्मण ' म्हणत. या विनोदाच्या लहानशा नांवांत माझें स्वभाववर्णन बरेंचसें

उतरलें आहे. एकदा आश्रमांतील एका पदवीधर शिक्षकांना लेडी सुपरिंटेंडेंट यांनी खालच्या इयत्तांवर काम दिलें. यामुळे आपला अपमान झाला अशी समजूत करून घेऊन ते ताठ्याने वर्ग शिकविण्याला गेले नाहीत. ही गोष्ट मजकडे आली तेव्हा मीं त्यांना बोलावलें व "तुमच्या वर्तनाबद्दल मी तुम्हाला बोलणार आहे, याबद्दल मला क्षमा करा," असें म्हणून त्यांना प्रथम साष्टांग नमस्कार घातला व नंतर "तुम्हीं केलें हें बरें केलें नाही" वगैरे त्यांना सांगितलें. हा सर्व प्रकार लेडी सुपरिंटेंडेंट यांच्या समक्ष घडला.

या दोषाचेंच एक भिन्न स्वरूप पुढील उदाहरणांत आहे. एकदा आश्रमांतील एका विद्यार्थिनीच्या हातून बराच मोठा अपराध घडला. अमुक एक गोष्ट तूं करूं नको, असें बजावून सांगितलें असतांहि तिने ती केली होती. ही मुलगी अतिशय तापट व प्रसंगीं भलतेंच कांही करील अशा स्वभावाची होती. शिवाय ती पोरकी होती. हिला आता काय शिक्षा करावी हा मला मोठा विचार पडला व हिला बोलूं लागल्यावर माझा राग अनावर होईल की काय, ही मला भीति पडली. मीं तिला एकटीलाच बोलवून आणलें व तिची कानउघाडणी करून तिने केलेल्या चुकीचा प्रसंगीं केवढा घातक परिणाम झाला असता, हें तिच्या नजरेला आणून दिलें. कांही वेळ माझी शांत वृत्ति राहिली; पण नंतर राग येऊं लागला. तथापि हिला कडक शिक्षा केली तर ती आततायीपणाने भलतेंच कांही करील, हा विचार मनांतून गेला नाही. सौम्य शिक्षेने कार्यभाग होण्यासारखा नव्हता. "या अपराधाला तुला कडक शासन पाहिजे; परंतु तें करण्याला मला धैर्य होत नाही, यासाठी तें मी स्वतःलाच करून घेतों" असें म्हणून खूप जोराने मीं आपल्याच श्रीमुखांत भडकाविली, व पुन्हा असें करूं नको, येवढें सांगून तिला परत पाठविलें. यानंतर मी तिच्याशीं मायेने वागलों, व पुढे तिने अपराधही केला नाही. ती आश्रम सोडून गेली असून हल्ली सुस्थितींत आहे.

या मनाच्या दुर्बलतेमुळेच माझ्या अंगीं उत्पन्न झालेला मोठा दोष म्हणजे हाताखालच्या व बरोबरीच्या मनुष्यांशीं योग्य रीतीने वागतां न

येणें हा होय. आश्रम, विद्यालय व मठ यांच्या परस्परसंबंधांत जी अनर्थ-परंपरा उत्पन्न झाली, तिचें मुख्य कारण माझ्या आंगचा हा दोष होय. या माझ्या स्वभावदोषाचे परिणाम कांहींना भोवलेच आहेत, व यापुढेहि ते कितीकांना भोवतील, हें सांगतां येत नाही. जोपर्यंत सर्व एकामार्गी होतें तोपर्यंत सगळें ठीक चाललें; पण भिन्न मतांचीं व परस्परांशीं पटत नाही अशीं अनेक मनुष्यें एकत्र जमल्यानंतर कलीला सुरुवात झाली. चार मनुष्यें एकत्र झालीं की, त्याचा थोडा फार प्रादुर्भाव व्हावयाचाच. कर्त्या माणसांचें खरें शहाणपण या बीजाला अंकुर फुटूं लागल्याबरोबर जेथच्या तेथे त्याचा मोड करण्यांत आहे. हें माझ्या अंगीं अगदीच नसल्यामुळे सर्व अनिष्ट प्रकार घडून आले. जेव्हा मीं उत्साहाने या गोष्टी हातीं घेतल्या, त्या वेळीं मला हे दूरवरचे परिणाम दिसले नाहीत. एकट्या मनुष्याशीं प्रसंग असल्यास आपण माघार घेऊन प्रकरण निकालाला लावतां येतें; परंतु परस्परांविषयी ज्यांचीं मनें शुद्ध नाहीत अशा अनेक व्यक्तींशीं प्रसंग आला म्हणजे मी गोंधळून जातों, व मला कांही सुचत नाही. अशा वेळीं मी कात्रींत सापडल्यासारखा होतों, व त्यामुळे मला व इतरांना फार ताप होतो. मला ताप होतो त्याबद्दल वाईट वाटत नाही. कारण, माझ्या स्वभाव-दोषाचा परिणाम मला भोगलाच पाहिजे. परंतु इतरांना ताप होतो त्याबद्दल फार वाईट वाटतें.

आणखी एक दोष—किंवा त्याला दोष म्हणण्यापेक्षा गुणाचा अभाव म्हणणें अधिक बरें—माझ्या अंगीं आहे. आपल्याबद्दल कोणाचा गैरसमज झालेला असला, तर योग्य वेळ साधून आपली बाजू युक्तिप्रयुक्तीने त्याज-पुढे मांडून तो दूर करण्याचें चातुर्य मजमध्ये नसल्यामुळे अशा प्रसंगीं मला काळावर भिस्त ठेवूनच स्वस्थ बसावें लागतें व केव्हा केव्हा गैरसमज अधिकच पसरत जातात.

जेथे आपलें समर्थन करण्यासाठी दुसऱ्याचा दोष अगर कमीपणा दाखविल्यावांचून गत्यंतर नसतें, तेथे आपणच कमीपणा पतकरून स्वस्थ बसणें मला बरें वाटतें. हें मी थोर मनाने करतों असें नव्हे. दुसऱ्याचा

दोष दाखवावयाचा म्हणजे तो सिद्ध केला पाहिजे व तें करणें सोपें नसतें; यासाठी आपली बाजू लंगडी आहे असें पतकरणेंच माझ्यासारख्या स्वभावाच्या मनुष्याला सोईचें होतें. यामुळे देखील कित्येक वेळां गैर-समज तसेच रहातात.

आश्रमाच्या कमिटीच्या सभांच्या वेळीं अंतःकलहासंबंधाचा कांही विषय निघाला तर 'मी आता वेडा झालों आहे' येवढेंच सांगून मी मोकळा होतो. या मंडळींची समजूत घालणें माझ्या आटोक्याबाहेर असल्यामुळे मला या मार्गाचाच अवलंब करावा लागतो.

आपणाकडून कोणा वडील माणसाला दुखविण्यासारखें कांही घड-ल्यास त्याची क्षमा मागणें जरूर असतें. मी मिळवूं लागल्यापासून दादांकडे खर्चासाठी पैसे पाठवूं लागलों. एकदा अधिक खर्च झाल्याबद्दल मी त्यांना जरासें लागण्यासारखें पत्र लिहिलें. हें पैसे मिळूं लागले म्हणून चढून जाऊन उद्दामपणाने लिहिलेलें नव्हतें. काटकसरीने खर्च करून उरलेला पैसा सत्कार्याकडे लागावा हा माझा हेतु होता. दादांना मी लिहिलेलें सहन झालें नाही. त्यांनी उलट पत्र लिहून माझी चांगली खरडपट्टी काढली. या पत्राचें उत्तर मी मनोवृत्ति उच्चंबळित होऊन लिहिलें व त्यांची क्षमा मागितली. पत्र लिहित असतांच मीं साष्टांग नमस्कार घातला व तसें केल्याबद्दल त्या पत्रांत उल्लेख केला. ह्याने त्यांचा राग शांत झाला. पुढे त्यांच्या संमतीने वारंवार पैसे पाठ-विण्याऐवजी एकंदर पंधराशे रुपये देण्याचें ठरवलें व वर्षदीड वर्षाच्या आंत देऊन टाकले.

माझा स्वभाव मूळचा रागीट, पण मी भितरा आणि भिडस्त असल्यामुळे माझ्या रागापासून दुसऱ्यांना फारसा ताप होत नाही. माझा राग आवर-ण्यासाठी मीं पुष्कळ यत्न केला व तो कांही अंशीं सफलही झाला आहे. तथापि राग अनावर होऊन कधी कधी त्याचा वाईट परिणाम घडतो. ही वृत्ति अनावर होऊन एकदा एका सत्पुरुषाला दुखविण्याचा अपराध

माझ्या हातून घडला. अविधवा मुलींना आश्रमाच्या शाळेंत घेण्याबद्दल जो शेवटला प्रयत्न मीं करून पाहिला, त्यावेळी आश्रमाच्या व्यवस्थापक मंडळीच्या सभेंत माझ्या मताविरुद्ध निकाल होऊन, मीं अशा मुलींसाठी पाहिजे तर वेगळी संस्था काढावी, असें ठरलें. भांडारकर अध्यक्ष होते. मला माझा राग आवरतां आला नाही आणि माझ्या चर्येने आणि तोंडांतून निघालेल्या शब्दांनी त्यांचा उपमर्द व्हावा असें वर्तन माझ्या हातूंन घडलें. मला हें खात असे. पण त्यांची क्षमा मागण्याचें मनोधैर्य मला झालें नाही. पुढे चार पांच वर्षांनी त्यांना पत्र लिहून मीं त्यांची क्षमा मागितली. आणि त्यांनी आपल्या सौजन्याला अनुरूप असेंच माझ्या पत्राचें उत्तर पाठविलें.

द्रव्याच्या संबंधाची हाव मला केव्हाही नव्हती. मला निष्कारण पैसे भरावे लागले किंवा माझे पैसे बुडाले तर मला कधी हळहळ लागली नाही. विद्यापीठाच्या वर्गणीच्या कामीं मला एक ठोकर लागली. एका मोठ्या शहरांत एका गृहस्थाकडे मी उतरलों. त्याचें बँकेमध्ये खातें होतें. ह्यासाठी त्याचे जवळ पैसे देऊन त्याजकडून एक चेक घेतला. दुर्दैवाने तो चेक वटावण्यासाठी पाठविला तेव्हा तो परत आला. मीं निमूटपणें चारशेसव्वीस रूपये भरले. दोन तीन पत्रें पाठविलीं तरी त्या गृहस्थाकडून उत्तर नाही. पुढे अतिशय लाजून त्यांनी उत्तर पाठविलें. नंतर मीं त्यांस कळविलें की, कधी सामर्थ्य आलें तर पैसे पाठवा, नाहीतर ते फिटले असें समजा.

पुढील उदाहरण वेगळ्या प्रकारचें आहे. एका गृहस्थांशीं माझा थोडासा परिचय झाला. यांमध्ये मनाचे कांही थोर गुण मला दिसून आले. हे पैशाच्या अडचणींत होते. यांना कायमची नौकरी होती, तेव्हा नियमितपणाने वागून हे पैशाची फेड करतील, याबद्दल मला शंका नव्हती. यासाठी अधिक व्याजाने काढलेल्या रकमा त्यांना परत करतां याव्या म्हणून मीं त्यांना ९२० रुपये दरसाल दरशेकडा ४ व्याजाने दिले आणि पावतीचें तिकिट लावून त्यांच्या व त्यांच्या कुटुंबाच्या हातची एक पावती

घेतली. याला तारण म्हणून हजाराची एक याप्रमाणे दोन पॉलिसी आपल्याजवळ ठेवून घेतल्या. हें माझें करणें अगदी निःस्वार्थपणाचें नव्हतें. निष्काम—कर्म—मठाला हे गृहस्थ योग्य होतील, अशी मला आशा वाटत होती व या हेतूने त्यांजवर उपकार करण्याची सहज आलेली संधि मीं साधली होती. पुढे कांहीं हेतूने त्यांनी आपल्या नोकरीचा राजिनामा दिला व ते पुणें सोडून गेले. पुढे सुमारें दीड वर्षांने आपण अडचणींत असल्याबद्दल त्यांचें पत्र आलें, तेव्हा मी त्यांना दहा रुपये पाठवून दिले. पुनः तीनचार महिन्यांनी तसेंच पत्र आल्यावरून त्यांना आणखी दहा रुपये पाठवले. नंतर ते वडिलांच्या शुश्रूषेसाठी पुण्यांत येऊन राहिले; पण दोनतीन महिन्यांत त्यांनी माझी गाठहि घेतली नाही. एकदा सहजी गांठ पडली तेव्हा त्यांना कसेंसेंच वाटलेंसें दिसलें. दुसऱ्याच्या देण्याबद्दल मनुष्याला केवढी ओशाळगत वाटते, या गोष्टीचा प्रत्यय मला त्या वेळीं आला. तेव्हा यांना ऋणांतून मुक्त करून आपण मोकळें व्हावें असा विचार मीं केला. चांगले विचार फार वेळ टिकत नाहीत, तेव्हा ते तीव्र असतांनाच मनुष्याने चांगलें कार्य उरकून घ्यावें; म्हणून हे विचार मंदावण्यापूर्वीच मीं त्यांना लिहून कळवलें की, अमुक दिवशीं तुम्हीं मला भेटावें म्हणजे तुमचे कागद परत देऊन तुम्हांला मोकळे करीन व मीहि मोकळा होईन. त्याप्रमाणे ते आले व तिकीट लावून घेतलेली त्यांची पावती फाडून त्यांच्या हवाली केली व पॉलिसी त्यांच्या स्वाधीन केल्या.

निराश्रित साहाय्यकारी मंडळाच्या तर्फे येथील किर्लोस्कर थिएटरांत एक मोठी सभा होती व त्या प्रसंगीं मीं एक लहानसें भाषण करावें, अशाविषयी या सभेचा पुरस्कार करणाऱ्या कांहीं मित्रांकडून मला सांगण्यांत आलें. आपल्या हिंदु समाजाला कलंक लावणारे जे कित्येक निंद्य प्रघात आपल्या समाजांत रूढ होऊन गेले आहेत, त्यांतलाच अस्पृश्य मानल्या जाणाऱ्या लोकांना वागविण्याचा प्रघात होय, अशी माझी दृढसमजूत झाली होती, व या कार्याचें महत्त्व आणि त्याचा नाजूकपणा

यांविषयींहि मला चांगली जाणीव उत्पन्न झाली होती. परंतु दुसऱ्या कार्यांत मन रमल्यामुळे या कामीं माझ्या हातून कांही होण्यासारखें नव्हतें. तेव्हा मित्रांचें सांगणें पतकरावें की नाहीं याविषयी मन द्विधा होत होतें. अखेरीला मला सद्बुद्धि होऊन मीं त्यांचें म्हणणें कबूल केलें. परंतु एखाद्या सत्कार्यासाठी कांहीएक न करतां नुसती शाब्दिक सहानुभूति दाखवणें मला कसेंसेंच वाटलें. तेव्हा प्रथम या कार्यासाठी शंभर रुपये देण्याचा संकल्प केल्याचें सांगून, नंतर मीं आपल्या भाषणांत मदत करण्यासाठी इतरांना विनंति केली. हे शंभर रुपये मीं लवकरच देऊन टाकेन.

स्वतःच्या व संस्थांच्या संसारांत येणाऱ्या अडचणींनी मी हताश होऊन जात नाही. आनंदाच्या प्रसंगीं माझें मन फार हलकें होतें, व कित्येक वेळां गहिवर येऊन आनंदाश्रु आवरेनातसे होतात. परंतु सामान्यतः दुःखाच्या अगर संकटांच्या प्रसंगीं माझें मन अतिशय कठोर बनतें. अशा वेळीं बहुधा दुःखाश्रु न येतां उलट प्रसंगाला तोंड देण्यासाठी एक प्रकारचें स्फुरण अंगांत चढतें.

कधींकधी मरणाविषयी विचार करून त्याविषयीची भीति नाहींशी करणें फार जरूर असतें. जन्माला आलेल्या व्यक्तींना व संस्थांना मरण हें आहेच; तें आज येतें, की कांही काळाने येतें, याचा कांही नियम नाही. हे विचार अनेक प्रसंगीं माझ्या मनांत येत असतात, व अशा आपत्तीच्या प्रसंगासाठीं मी आपलें मन तयार करून ठेवीत असतों. प्रेमाच्या मनुष्यांच्या गाठीं पडतात त्या वेळीं ही आपली शेवटचीच भेट, असें समजून आपण चालूं, असे उद्गार मी काढीत असतों. पोटच्या मुलांना मूठमाती देण्याचा प्रसंग आईबापांवर आलेले आपण पाहतों. त्याप्रमाणे आपण वाढवलेल्या संस्थांना मूठमाती देण्याचा प्रसंग मजवर येणार नाही म्हणून कशावरून? तसा प्रसंग आला असतांहि माझें धैर्य खचूं नये, व प्राप्तस्थितींत आपल्या हातून कांही सत्कर्म घडावें, अशासाठीं मन कठोर बनवण्याचा प्रयत्न मी

करीत असतों. असे उद्गार कांही मंगलप्रसंगींहि आश्रम–विद्यालयांच्या मुलींसमोर मीं काढले आहेत. मरण ही व्यवहारांत नित्य घडून येणारी गोष्ट आहे. तिजबद्दल विचार करून ‘ आपुलें मरण देखिलें म्यां डोळां । तो झाला सोहाळा अनुपम ॥ ” अशी मनःस्थिति अल्पांशाने तरी अनुभवण्याचा यत्न मी कधीकधी करीत असतों. विशेष अडचणींच्या प्रसंगीं असले विचार प्रमुखत्वाने पुढे येतात, हें सांगणें नकोच. अडचणींचे प्रसंग हे मनुष्यांचे खरे शिक्षक होत.

# प्रकरण एकतिसावें

## धर्म व तत्त्वज्ञान यांविषयी कांही विचार

पूर्वीच्या काळांत स्वतंत्रपणें विचार करणारीं मनुष्यें फारच थोडीं असत. त्या थोड्यांनी विचार करावा आणि बाकीच्या सर्वांनी परंपरेने प्राप्त झालेल्या त्या विचारांचें अंधश्रद्धेने ग्रहण करावें असा प्रकार चालत असे. जुन्या आचारविचारांवर श्रद्धा ठेवून त्याप्रमाणे वागणारे सर्वच लोक अंधश्रद्धेच्या कक्षेंत येतात, असें माझें म्हणणें नाही. नव्याजुन्याचें शक्त्यनुसार परीक्षण करून विचारपूर्वक जुन्याचें ग्रहण करणारे अंध-श्रद्धेच्या कक्षेंत येत नाहीत. अलीकडल्या काळांत स्वतः विचार करणारांची संख्या फार वाढली आहे व कोणत्याहि विचारांचें ग्रहण करतांना तें केवळ अंधश्रद्धेने न करतां युक्तिवादाला व अनुभवाला पटण्यासारखे ते आहेत की नाहीत हा विचार करणारे लोक अगदी सामान्य जनांतसुद्धा उत्पन्न होत आहेत. याचा साहजिक परिणाम असा होत आहे की, जुन्या काळचे धर्मविचार व समजुती यांवरून लोकांची श्रद्धा उडत आहे. जगांतल्या प्रगतिपर सर्व राष्ट्रांत हा प्रकार घडून येत आहे व तीच लाट पाश्चात्य विद्येबरोबर जोराने हिंदुस्थानांत आली आहे. सर्व प्रकारचीं मतें आणि समजुती चिकित्सक बुद्धीच्या कसोटीला लावण्याची सामान्य मनुष्यांत सुद्धा जी प्रवृत्ति होत आहे तीमुळे धर्मविचारांत होत जाणारा फेरफार राष्ट्राची व धर्माची अवनति करणारा आहे, असें पुष्कळांना वाटतें. परंतु मला हा फेरफार राष्ट्रोन्नतिकारक वाटतो. कांहीएक विचार न करतां परंपरेने प्राप्त झालेल्या समजुतींना चिकटून राहणें, हें त्या समजुती बरोबर आहेत असें धरून चाललें तरी देखील मनुष्याची अवनति करणारें आहे, व विचार करून जुन्यानव्या मतांतून निवड करतांना मनुष्याने चुकी केली व असत्य मताचें ग्रहण केलें तरी तें त्याच्या उन्नतीच्या मार्गांतलें आहे, अशी माझी समजूत आहे. मनुष्याने

जबाबदारी ओळखून प्रामाणिकपणे विचार करावा व सत्य वाटणाऱ्या मतांचें ग्रहण करून जेथे संशय वाटेल तेथे कोणतेंच ठाम मत बनूं न देणें, हें श्रेयस्कर आहे.

स्वतंत्र विचार न करतां आपोआप बनलेल्या पापपुण्यांविषयीच्या व ईश्वराविषयींच्या माझ्या कल्पना जसजसा स्वतंत्र विचारांचा उदय होऊं लागला तसतशा लयास जाऊं लागल्या. परमेश्वराची पूजाअर्चा, प्रार्थना, भजन, जपजाप्य वगैरे गोष्टींकडे माझें मन कधींहि वळलें नाही. साधुसंतांच्या ग्रंथांतील नीति, वैराग्य, परोपकार वगैरेसंबंधाच्या प्रासादिक लेखांनी माझ्या मनोवृत्ति उचंबळूं शकतात, व भक्तीच्या मनोवृत्तीने कांहीं मनुष्यें जशीं ईश्वरभजनांत तल्लीन होऊन जातात त्याप्रमाणे मी कधीकधी असली पद्यें पुनः पुनः घोळून म्हणण्यांत अगर त्यांतील विचारांचें मनन करण्यांत गढून जातों.

परस्परविरोधी अनेक गोष्टी पुढे आल्या असतां तर्कशास्त्राची कसोटी लावून सत्यासत्य, न्यायान्याय यांचा निर्णय करण्यास लागणारा विचारांचा जोम व बुद्धीची तीव्रता यांचा मजमध्ये अभाव असल्यामुळे पुष्कळ तात्विक व व्यावहारिक गोष्टींतहि मनाचा कोणताहि निश्चय न करतां मी आपलें मन मध्यस्थ राहूं देतों. आपल्या अनुभवाला येतील व मनाला पटतील तेवढ्या थोड्याशा गोष्टींविषयी मनाचे ग्रह करून ते आचरणांत आणावयाचे व इतर गोष्टींविषयी कायमचे ग्रह होऊं द्यावयाचे नाहींत याविषयी माझा यत्न असतो.

कोणतेंहि धर्मपुस्तक ईश्वरप्रणीत नाही व कोणतीहि व्यक्ति ईश्वरी अवतार नाही, असें जे मानतात, ते आपल्या राष्ट्रांतील बहुमोल धर्मग्रंथांचा अगर अवतारी म्हणून मानलेल्या पुरुषांचा अनादर करतात असें म्हणणें योग्य होणार नाही. आईबापांच्या मतांशी आपलीं मतें सर्वथैव जुळत नाहींत, यासाठी कांहीं गोष्टींत त्यांच्या इच्छेप्रमाणे न वागणारा मुलगा आईबापांशीं प्रेमाने व पूज्य बुद्धीने वागूं शकेल; त्याचप्रमाणे वरील मतें धारण करणारा मनुष्यहि आपल्यां राष्ट्रांतील उत्कृष्ट ग्रंथ, थोर विभूति आणि

त्यांनी घालून दिलेल्या परंपरा यांविषयी आदर व पूज्यबुद्धि बाळगूं शकेल. त्याचें म्हणणें एवढेंच असणार की, देशकालास अनुसरून पूर्वपरंपरेंत क्रमाक्रमाने बदल होत गेला पाहिजे. राष्ट्रीय ग्रंथ, राष्ट्रीय पुरुष आणि राष्ट्रीय परंपरा हीं सर्व राष्ट्राचें जीवन होत; परंतु प्राचीन काळच्या आचाराविचारांच्या परंपरेंत जें श्रेष्ठ व रक्षणीय आहे तेवढेंच राखून बाकीचें हळूहळू बदलीत गेलें पाहिजे.

पाश्चात्य शिक्षणाने उद्भवलेल्या विचारांनी अंधश्रद्धा नाहीशी होऊन प्रत्येक गोष्टीला विचाराची कसोटी लावण्याची सवय झाल्यानंतर आपणाला समजतील व पटतील अशीं सत्पुरुषांच्या तोंडचीं वचनें वाचावीं व त्यांचें मनन करावें आणि अल्पांशाने सद्विचार कृतींत उतरविण्याचा यत्न करावा एवढेंच माझें धर्माचरण बनलें.

आपणाला कोणी शत्रु उत्पन्न होऊं द्यावयाचा नाहीं, हें करणें जसें अशक्य कोटींतलें आहे, तसें आपण कोणाचें शत्रुत्व करावयाचें नाहीं हें करणें नाहीं. अर्थात् तुलनेच्या दृष्टीने दुसरें पहिल्यापेक्षा सोपें इतकेंच; परंतु दुसरेंहि अत्यंत कठिण आहे. मनोवृत्ति प्रक्षुब्ध झाल्यावर दुसऱ्याच्या संबंधाने द्वेषाच्या अगर वैराच्या कल्पना मनांत आल्यावांचून राहत नाहीत. पण ती वेळ निघून गेल्यानंतर जेव्हा आपण एकान्तांत शांत मनाच्या स्थितींत असतों, तेव्हा ज्यांविषयी अशा कल्पना मनांत आल्या त्यांच्याविषयींच प्रेमाचे विचार मनांत आणणें, त्यांचें कल्याण व्हावें असें चिंतणें, प्रथमदर्शनीं वाटतें तितकें कठिण नाहीं. ज्यांच्या अंतःकरणांत आपणाविषयी बरी भावना नसल्याचा आपल्याला संशय येत असेल त्यांच्याविषयी एकान्तांत शुभविचार घोळवणें हे अभ्यासाने मनुष्याला शक्य आहे, हें मी अत्यल्प स्वानुभवावरून म्हणूं शकतों. असे प्रयत्न आत्मोन्नतिकर आहेत, अशी माझी समजून झालेली आहे. यामुळे माझ्या आचरणांत दृश्य फरक पडला आहे, असें मला वाटत नाहीं. कारण प्रसंग आला म्हणजे मनोवृत्ति क्षुब्ध होऊन त्यांचे परिणाम व्हावयाचे ते होतातच. तथापि वरील प्रयत्न दुष्ट मनो-

वृत्तींचा पगडा मनावर फार वेळ राहूं देत नाहीत. कांही असो. वरील ध्येयापासून आपण कितीहि दूर असलों तरी त्याच्यासाठीच तळमळ लागावी व त्या बाजूने अत्यल्प तरी बुद्धिपुरःसर यत्न व्हावा म्हणजे माझ्या जन्माचें सार्थक होईल, असें मला वाटतें.

हा माझा धर्म, हीच माझी नीति, हेंच माझें तत्त्वज्ञान. हें अल्प अंशाने तरी आपल्या अंगीं मुरावें म्हणून माझी तळमळ व धडपड. यापलीकडील गोष्टी मला कळत नाहीत. त्यांविषयी कोणताहि पूर्वग्रह होऊं न देतां त्या कळण्याविषयी उन्मुख राहून आपणामध्ये त्या उत्क्रान्त होईतोपर्यंत उतावीळपणें त्यांच्या पाठीला न लागतां स्वस्थपणें दृष्टीपुढला मार्ग क्रमीत राहण्याचें धर्माचरण मजकडून देहावसानापर्यंत होवो, येवढीच माझी इच्छा आहे.

# प्रकरण बत्तिसावें

## उपसंहार

एका काळीं ज्ञानानें आणि संपत्तीनें जगाला दिपवून टाकणारें आपलें राष्ट्र आज हीन स्थितीला पोंचलेलें आहे. जोंपर्यंत देशकालवर्तमान पाहून योग्य ते फेरफार करण्याचें सामर्थ्य राष्ट्रांत असतें तोंपर्यंतच तें राष्ट्र जिवंत आहे, असें म्हणतां येईल. तें सामर्थ्य नाहींसें झालें म्हणजे राष्ट्र अवनतीच्या मार्गाला लागतें व अखेरीस अगदीं निर्जीव होऊन जातें. पाणी ज्याप्रमाणें वाहत असतें तोंपर्यंत स्वच्छ राहतें, पण वाहणें बंद होऊन त्याचें डबकें बनलें, म्हणजे त्या साचलेल्या पाण्याची जी स्थिति होते तीच राष्ट्राचीही होते. मध्यंतरीं आमच्या राष्ट्रांत जिवंतपणा आणण्याचे कांहीं प्रयत्न झाले पण ते फुकट जाऊन आपणांस हल्लींची स्थिति प्राप्त झाली आहे. त्यांतल्या त्यांत आनंदाची गोष्ट येवढीच कीं, आपल्या स्थितीची जाणीव आपणांस होऊं लागली आहे. व तींतून पार पडण्यासाठीं थोडीशी धडपड सुरू झाली आहे, परंतु ती अजून फारच लहान प्रमाणांत आहे. आज राजकीय, सामाजिक, औद्योगिक आणि शैक्षणिक क्षेत्रांत लहान मोठ्या कार्यकर्त्यांची फार जरूरी आहे. प्रत्येकाला प्रथम आपल्या पोटापाण्याचा प्रश्न सोडवणें भाग आहे; पण तो सोडवीत असतां ज्याच्या मनांत थोडी तरी विचारजागृति झालेली असेल तो कितीही हीन स्थितींत असला तरी त्याला त्याच्या सामर्थ्याप्रमाणें थोडें तरी राष्ट्रकार्य खचित करतां येईल. मी राष्ट्राचा एक घटक आहे व मजवर राष्ट्राच्या प्रगतीच्या कामीं हातभार लावण्याची जबाबदारी आहे ही भावना अंतःकरणांत उत्पन्न होऊन स्थिर झाली तर कोणत्याही मनुष्याला आपल्या मगदुराप्रमाणें व आवडी निवडीप्रमाणें लहान मोठें कार्यक्षेत्र आखून घेतां येईल. स्वार्थ-विरहित विचारांना चालना देण्याचें व त्यांना अनुरूप असें आचरण

करण्याचें सामर्थ्य ह्या संक्षिप्त आत्मवृत्ताने चार दोन वाचकांमध्ये जरी उत्पन्न केलें तरी आपल्या श्रमाचें चीज झालें, असें मला वाटेल.

सरते शेवटीं अपत्यवत् मानलेल्या संस्थांसंबंधी चार शब्द लिहितों. ह्यांपैकी कित्येक संस्था लयाला गेल्या व कित्येकांची जबाबदारी दुसऱ्यावर सोपवून बरेच वर्षांपूर्वी त्या हातावेगळया केल्या. महिला विद्यालय आणि निष्कामकर्ममठ ह्या हिंगणाच्या आश्रमांत अंतर्भूत झाल्या. आश्रमांतून महिला विद्यापीठ उत्क्रान्त व्हावें, हें माझें स्वप्न मूर्तसृष्टींत आलेलें पाहण्याचें भाग्य मला लाधलें. आश्रमाच्या जबाबदारीतूनहि मी बहुतेक मोकळा झालों आहें. विद्यापीठाचें क्षेत्र अमर्याद आहे. त्यासंबंधाचें स्वप्न केवळ मनोराज्य आहे. पण तें ह्या ठिकाणीं दाखल करणें जरूर वाटतें. आपल्या देशांतल्या वेगवेगळया प्रान्तांत दहाबारा भाषा प्रौढ स्थितीला येऊन पोचल्या आहेत. ह्या प्रत्येक प्रान्तासाठीं वेगळें महिला-विद्यापीठ उत्पन्न होऊन त्याचें निदान एक तरी पूर्ण कॉलेज व जिल्हानिहाय हायस्कुलें त्याला जोडलेलीं असावीं. हें स्वप्न मूर्त सृष्टींत आणण्याची धडपड करणें दूरच राहिलें पण नाथीबाई महिला-विद्यापीठावर आलेल्या संकटाला तोंड देण्याचें काम सुद्धा मी माझ्या सहकाऱ्यांवर सोपवलें आहे. आता शाब्दिक मदत शक्य तेवढी करावी व जें होईल तें पाहत राहावें, ह्यापलीकडे मजकडून कांही होईल असें दिसत नाही. विद्यापीठाच्या प्रगतीसंबंधाची वासना मात्र अजून तीव्र आहे व पुनर्जन्माच्या कल्पनेंत जर सत्य असेल तर पुनः पुनः ह्या देशांत जन्माला येऊन आपलें स्वप्न मूर्त सृष्टींत आलेलें पाहावें, ही इच्छा प्रबल आहे.

# परिशिष्ट

## प्रवासाचें टिपण

| स्थळाचें नांव | घालविलेले दिवस | व्याख्यानांची संख्या | श्रोत्यांची संख्या | * चहा जवणांचीं निमंत्रणें | मुलाखती | शैक्षणिक संस्थांना भेटी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **इंग्लंड** एप्रिल १९२९ | | | | | | | |
| लंडन | २ | १ | ८० | १ | | | |
| मालव्हर्न् | ५ | १ | ८५ | | | | प्राथमिक शिक्षकांचें संमेलन |
| लंडन | ४ | १ | ८० | २ | | | |
| सँडाऊन, आइल ऑफ वाइट | ६ | १ | १०० | | | | हिंदी लोकांचें संमेलन |
| **फ्रान्स** एप्रिल १९२९ | | | | | | | |
| पारिस | ९ | ४ | १५० | २ | १ | | |
| **ग्रेट ब्रिटन् आणि आयर्लंड** मे ते जुलै १९२९ | | | | | | | |
| लंडन | ६ | | | | १ | | |
| केंब्रिज | ३ | २ | ५० | २ | | | |
| लंडन | १० | ५ | २७५ | ६ | | | |
| वोबर्न् | १ | | | | | | डॉ. मॅनच्या प्रयोगशाळेस भेट |
| ऑक्सफर्ड | २ | १ | १५ | १ | ३ | ३ | |
| मँचेस्टर | २ | १ | ३५ | | | | |

* मोकळेपणीं संभाषणाला वेळ मिळावा ह्या हेतूने हीं निमंत्रणें दिलेलीं असतात.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| डग्लस्, आइल ऑफ मॅन् | २ | | | | | | सर क्लॉड हिल, ले. गव्हर्नर आइल् ऑफ मॅन् यांस भेट |
| लिव्हरपूल | ४ | ४ | २६० | ३ | | ६ | |
| डब्लिन | ५ | ३ | १२५ | ४ | ४ | ६ | |
| ग्लासगो | ५ | २ | १०० | | १ | ७ | |
| एडिंबरो | ५ | २ | ७५ | १ | १ | १ | |
| न्यूकॅसल् ऑन टाइन् | १ | १ | ३० | | | | |
| लीड्स् | ८ | ३ | २५० | १ | २ | | लेक डिस्ट्रिक्टमध्ये २ दिवस घालविले |
| शेफील्ड | २ | १ | ६० | | | | |
| इल्क्ले | १ | | | | | | लीड्स् युनिव्हर्सिटीच्या आंतराष्ट्रीय संघाचें वार्षिक संमेलन |
| बर्मिंगहॅम् | ३ | २ | १२५ | ३ | | | |
| लंडन | १६ | ३ | २०० | ४ | १ | ५ | हाय् वायकोंब येथील गार्डन् स्कूल व लेचवर्थ ह्या गार्डन् सिटीला भेट |
| **बेलजम आणि हॉलंड** जुलै १९२९ | | | | | | | ब्रूज, आंत्वर्प, रोटरडाम, हाग आणि आमस्टरडाम या गावी थोडा थोडा मुक्काम |
| **स्वित्झर्लंड** जुलै-ऑगस्ट १९२९ | | | | | | | शैक्षणिक संस्थांच्या प्रतिनिधींची जागतिक परिषद |
| जिनिव्हा | ५० | २ | ७५ | | | | बोटीने लाक लेमनची आणि मोटरने माऊंट ब्लँकची सफर |
| बाझल | १ | | | | | | ब्लॅक फॉरेस्टची लहानशी सफर |
| **डेन्मार्क** ऑगस्ट १९२९ | | | | | | | शिक्षणविषयक जागतिक परिषद |
| एल्सिनोर | १५ | २ | १५० | | | | |
| कोपेनहागेन | २ | | | | | २ | |
| **स्वीडन** ऑगस्ट १९२९ | | | | | | | |
| स्टॉकहोल्म | ३ | १ | १५० | | | ६ | उप्साला युनिव्हर्सिटीस भेट |

| स्थळाचें नांव | घालविलेले दिवस | व्याख्यानांची संख्या | श्रोत्यांची संख्या | चहा-जेवणांची निमंत्रणें | मुलाखती | शैक्षणिक संस्थांना भेटी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **नॉर्वे** ऑगस्ट १९२९ | | | | | | | |
| ओस्लो | २ | १ | १२५ | | | ३ | |
| **जर्मनी** सप्टेंबर १९२९ | | | | | | | |
| बर्लीन | ८ | २ | १५० | | १ | ३ | |
| लाय्प्झिग् | ४ | १ | १०० | | | १ | |
| हांबूर्ग | ४ | १ | १५० | | | २ | |
| **युनायटेड् स्टेटस् ऑफ अमेरिका** सप्टेंबर ते डिसेंबर १९२९ न्यूयॉर्कमध्ये राहून फिलाडेल्फियापर्यंतच्या गावांना भेटी | | | | | | | |
| न्यूयॉर्क सप्टेंबर २६ ते नोव्हेंबर २ | | १० | १२०० | २१ | ११ | १ | |
| स्केनेक्टडी | ३ | | | | | | जनरल इलेक्ट्रिक कंपनीस भेट |
| पूकिप्सी | १ | ३ | ३० | | | | व्हासर कॉलेज |
| हानोव्हर | १ | १ | १५० | | | | डार्टमथ् कॉलेज |
| बोस्टन | २ | ३ | ३२५ | २ | २ | २ | |
| साराटोगा स्प्रिंग्ज | १/२ | १ | ६०० | | | | स्किड्मोर कॉलेज |
| विल्यम्स् टाउन् | १/२ | १ | ३० | | | | वुइल्यम्स् कॉलेज |
| नॅक | १ | १ | २५ | | | | क्लार्कस् टाऊन कंट्री क्लब |
| वेस्टटाऊन | १ | १ | ४०० | | | | वेस्टाऊन स्कूल |
| जॉर्ज स्कूल | १ | १ | ५०० | | | | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| फिलाडेल्फिया | ३ | ३ | ७०० | २ | २ | ३ | ब्रिन् मॉर कॉलेज |
| ब्रिन् मॉर | ½ | १ | ७५ | | | | |
| वॉशिंग्टन | ३ | ४ | ३७५ | १ | २ | १ | |
| ग्रीन्सबरो | १ | ३ | ९५० | | ३ | | |
| पिट्सबर्ग | ८ | ८ | ६५० | ११ | २ | ३ | |
| डिट्रॉइट | ४ | ६ | ४०० | ३ | १ | १ | |
| ॲन् आर्बर | १ | ५ | ५० | १ | १ | १ | |
| शिकागो | ५ | ७ | ११०० | ५ | १ | २ | |
| कौन्सिल ब्लफ्स् | ३ | ४ | ३२५ | १ | | १ | |
| आयोवा सिटी | १ | १ | १५० | | | | |
| डिमॉइन् | १ | ४ | २८०० | १ | | ३ | |
| लॉस् एंजल्स् | ६ | ७ | ११०० | ७ | २ | २ | |
| क्लेअर मॉंट | ½ | १ | १५० | १ | | | |
| रिव्हर साइड | ½ | १ | ५०० | १ | | | |
| ओक्लंड | ३ | ३ | ४०० | ३ | | | मिल्स कॉलेजांत पाहुणे |
| सॅन्फ्रान्सिस्को | ६ | ४ | २०० | ६ | | | |
| स्टॉकटन् | ½ | १ | १० | | | | |
| सॅक्रॅमेंटो | ½ | १ | २५० | | | | |
| **जपान** जानेवारी १९३० | | | | | | | |
| योकोहामा आणि टोकिओ | १० | २ | १५० | १ | १ | ८ | स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीस भेट |
| कोबे | ८ | ७ | ५७५ | ५ | | ८ | |

| स्थळांचें नांव | घालविलेले दिवस | व्याख्या-नांची संख्या | श्रोत्यांची संख्या | चहा जेवणांचीं निमंत्रणें | मुला-खती | शैक्षणिक संस्थांना भेटी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **चीन** जानेवारी–फेब्रुवारी १९३० | | | | | | | |
| शांघाय | ८ | १ | २५ | ३ | | १ | |
| हाँगकाँग | ८ | २ | १०० | ३ | | | |
| **फिलिफाइन बेटें** फेब्रुवारी १९३० | | | | | | | |
| मॅनिला | ५ | ४ | ६५० | १ | २ | | |
| **जाव्हा** मार्च १९३० | | | | | | | |
| सुरबाया | ४ | २ | १५० | १ | | | |
| जोक्जा | १ | | | | | | बडाबुद्ध स्तूप |
| बटेव्हिया | ३ | २ | १०० | | १ | | |
| **मलाया द्वीपकल्प** मार्च–एप्रिल १९३० | | | | | | | |
| सिंगापूर | ८ | ५ | ५०० | १ | | | |
| क्वालालुंपूर | ५ | २ | ५५० | | | | |
| ईपो | ४ | १ | ६० | १ | | | |
| टायपिंग | २ | १ | ७५ | | | | |
| पेनांग | ५ | २ | १५० | | | | |

| स्थळ | राहिलेले दिवस | व्याख्यानांची संख्या | श्रोत्यांची संख्या | चहा जेवणांचीं निमंत्रणें | मुलाखती | शैक्षणिक संस्थांना भेटी |
|---|---|---|---|---|---|---|
| **केनिया कॉलनी** जानेवारी, फेब्रु. व आक्टो. १९३१ आणि फेब्रुवारी १९३२ | | | | | | |
| ×मोंबासा | ९९ | ६ | १२०० | ९ | ३ | ३ |
| नायरोबी | १६ | २ | ४५० | ७ | २ | ४ |
| एल्डोरेट | २ | १ | १०० | | | १ |
| किटाले | १ | १ | ४० | | | १ |
| **युगांडा** मार्च, एप्रिल, मे १९३१ | | | | | | |
| टरोरो | १ | १ | ३० | | | |
| कलीरो | ३ | | | १ | | |
| नामागांडा | २ | | | १ | | |
| कमली व भोवतालचे गाव | ९ | १ | २५ | २ | | |
| जिंजा | १९ | २ | ३०० | ४ | | २ |
| लुगाझी | २ | | | १ | | |
| कंपाला | १७ | २ | १६० | ४ | ३ | ३ |
| मसाका | ३ | १ | ५० | | | २ |
| एन्टेबी | ३ | १ | ७५ | | | १ |
| होइमा | २ | १ | ५० | | | १ |
| मसिंडी | २ | १ | ६० | | | |
| मबाले | ५ | १ | १०० | १ | | २ |
| सोरोटी | २ | | | १ | | |
| **झांझिबार** सप्टेंबर १९३१ | | | | | | |
| झांझिबार | १९ | ४ | ८०० | २ | २ | ५ |

---

×हें मुख्य ठिकाण असल्यामुळे थोडेसें काम झाल्यावर येथे परत येऊन कोठ कोठे जावयाचें, कोणाकडे उतरावयाचें वगैरे कार्यक्रम ठरवून ओळखीचीं पत्रें द्यावीं लागत, ह्यामुळे येथे पुष्कळ दिवस राहावें लागलें.

| स्थळ | घालविलेले दिवस | व्याख्यानांची संख्या | श्रोत्यांची संख्या | चहा जेवणांचीं निमंत्रणें | मुलाखती | शैक्षणिक संस्थांना भेटी |
|---|---|---|---|---|---|---|
| **टँगॅनिका** जून, जुलै, ऑगस्ट १९३१ | | | | | | |
| टांगा | ९ | ३ | ३०० | २ | | २ |
| मोशी | ४ | २ | १२५ | १ | | |
| अरुशा | ४ | २ | १०० | ५ | | |
| दारेसलाम | ३३ | ४ | ३०० | ४ | २ | ५ |
| बागामोयो | १ | | | १ | | १ |
| मोरोगोरो | ५ | १ | २५ | १ | | |
| किलोसा | १ | १ | ३० | | | |
| डोडोमा | ४ | १ | ५० | १ | | १ |
| टबोरा | १३ | ३ | १७० | २ | १ | २ |
| किगोमा | ५ | १ | २० | | | |
| म्वांझा | ९ | ३ | १२० | २ | | |
| शाणवा | १ | | | | | |
| बुकोबा | ६ | ३ | १२५ | २ | | २ |
| कामाचू | १ | १ | १५ | | | |
| लिंडी | ४ | २ | ८५ | | | १ |
| मिकिंदानी | १ | १ | ५० | | | |
| **पोर्तुगीज पूर्व आफ्रिका** नव्हेंबर १९३१ | | | | | | |
| लोरेन्सो मार्किस | २ | १ | ४० | १ | | |
| **दक्षिण आफ्रिका** नव्हेंबर, डिसेंबर १९३१, जानेवारी १९३२ | | | | | | |
| डर्बान | ३३ | १० | २४०० | १० | २ | ७ |
| फिनिक्स | २ | | | | | |
| पीटर मारित्झबर्ग | १ | | | | | |
| लेडी स्मिथ | ४ | २ | १६० | १ | १ | |
| जोहान्सबर्ग | १८ | ६ | ९५० | ८ | ४ | |
| प्रिटोरिया | १ | १ | ३०० | | | |
| किंबर्ले | २ | | | | | |
| डी. आर. | १ | | | | | |
| केपटाउन | ८ | ४ | २४० | ४ | ३ | |
| यूटनहेग | १ | १ | २५ | | | |
| पोर्टएलिझाबेथ | २ | २ | १६० | | | |
| ईस्ट लंडन | २ | १ | ६० | | | |